# नवभारत

जुलै २०११

वादविषय इतिहास व परिशुद्ध दृष्टी

स्वतंत्र विदर्भ राज्य-ध्यास, विचार आणि चळवळ

केवळ पत्रकारिता शिक्षण नव्हे, समग्र समाजालाच संवाद-माध्यम शिक्षित करण्याची गरज आहे

सत्यशोधक चळवळीच्या मार्क्सवादी प्रेरणा

गांधीविचार आणि २१ व्या शतकाची आव्हाने

अनुक्रमणिका

















नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६४। अंक १०। जुलै २०११
ज्येष्ठ/आषाढ शके १९३३
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संग्रहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका






# नवभारत

## जुलै २०११

## अनुक्रमणिका

# वादविषय इतिहास व परिशुद्ध दृष्टी

श्री. बाबूराव चंदावार

**प्रस्तावना**

इतिहासाचे ओझे डोक्यावर वाहणारा समाज स्वत:चा इतिहास घडवत नसतो. कारण, ओझ्याने वाकलेला समाजाचा कणा मान ताठ करून चालण्याच्या लायकीचा होत नसतो व नाही. तरीही इतिहासाचे आकर्षण कमी होत नाही, कमी झालेलेही नाही. अर्थात, जेव्हा इतिहास चघळला जातो तेव्हा उज्ज्वल भविष्याची दिशा काळवंडून जाते. म्हणून, इतिहास कळायला हवा असतो. तो कसा कळू शकेल याची काही एक पद्धती असते व असूच शकते, ती स्वीकारता यायला हवी. ती स्वीकारलीच जात नसावी म्हणून इतिहासाचे वाद निर्माण होतात. कारण, इतिहासाचे सार ग्रहण करणे शक्य होत नाही व ते ग्रहण केलेही जात नाही.

लिखित इतिहास जशाचा तसा स्वीकारायचा नसतो. कारण, हा इतिहास ज्या साधनांच्याद्वारे आकलनात आणण्याचा प्रयत्न केला जातो, ती साधने परिशुद्ध असतीलच याची खात्री देता येत नाही. म्हणून, लिखित इतिहास परिपूर्ण मानलाही जात नाही. यामुळे इतिहासाचे सतत संशोधन करून त्याचे पुनर्लेखन करावे लागते, व हे केलेच जाते. तरीही ते परिशुद्ध असण्याची शक्यता नसते, म्हणजे याची खात्री देता येत नसते व नाही. कारण, इतिहास लेखन व ते परिशुद्ध करण्यासाठी केले जाणारे सततचे पुनर्लेखन हे सर्व ज्या एका दृष्टीतून केले जाणे गरजेचे असते, ती दृष्टीही परिशुद्ध असावीच लागते. म्हणून, इतिहास लेखनाला अर्थातच परिशुद्ध दृष्टीची गरज असते. पण, अशी ज्यांना प्राप्त होते व होऊ शकते, ते इतिहास लेखनाला प्रवृत्त होतील व ते यासाठी पात्र ठरू शकतील किंवा काय, असा एक प्रश्न सहजच उपस्थित होतो. कारण, परिशुद्ध दृष्टी बाळगून इतिहास लेखन करता येणे शक्य होईल, असे वाटत नाही. म्हणून, इतिहासाची परिशुद्ध दृष्टी म्हणजे नेमके काय, याचा उलगडा व्हावयाला हवा असतो!

**दरबारी इतिहास**

जे घडले त्याला इतिहास म्हटले जाईल. पण, जे घडले त्याचा अर्थ लावून ते कसे प्रस्तुत केले गेले व प्रस्तुत केले जावे, हे पहायला हवे. कारण, इतिहासातल्या घटना सदोदित राज्यकरण्याच्या व राज्यविस्ताराच्याच सामान्यतः असतात. त्या आजवर तशाच राहिलेल्याही आहेत. म्हणून, यातून जे लिहिले गेले अथवा नोंदले गेले आहे, ते राज्यकर्त्यांच्या हालचालीच्या व सक्रियतेच्या ज्यातून त्यांचे कर्तृत्व निपजले, त्याचेच प्रस्तुतिकरण असते व आहे. म्हणून, इतिहास राज्यकर्त्यांचाच राहू शकला. राज्यातल्या लोक व समूह अथवा प्रजाजनांचा इतिहास राहू शकलेला नाही. कारण, तो तसा नसतोच!

आक्रमकतेला इतिहासात प्रतिष्ठित केले गेले आहे. कारण, राजा वा राज्यकर्त्यांचा हा विशेष गुण मानला गेला आहे. आक्रमणातूनच राजाला पुरुषार्थ करता येतो. कारण, हा पुरुषार्थ राज्यविस्तार करण्याची प्रेरणा देतो. यातूनच चक्रवर्ती सम्राट होता येते. अशा तऱ्हेने प्रजेवर राज्य करणाऱ्यांचे पूजन इतिहासात जे आढळून येते ते बलोपासनेतून प्राप्त करता आलेल्या आक्रमक शक्तीचे असते व आहे. यातून राजाला सर्व शक्तिमान दाखवण्याचा इतिहासाचा धर्म होऊन बसलेला आहे. म्हणून, इतिहास लिहिणेही राजाला समर्पित धर्मच झाला. राजदरबारातल्या राजाचे स्तुतिपाठक राजाला खुश करण्यासाठी राजाचे गुणगान करून ते लिपिबद्ध करीत असत. यातून इतिहासाचा जन्म झाला आहे. म्हणून, इतिहास दरबाऱ्यांनीच लिहिलेला आहे व त्यांनीच तो लिहावयाचा असतो, अशी एक मान्यताच होऊन बसलीही आहे. या काळातही यात फारसा बदल झालेला दिसत नाही!

**इतिहास सत्याधारीत नसतो**

राजे व राजेशाही तसेच त्यांची दरबारे जरी नाहीशी झालेली असली, तरी त्यांचा संस्कार अद्याप पुसला गेलेला नाही. म्हणून, राजेशाहीतले दरबार व दरबारी










लोकशाहीच्या राज्यव्यवस्थेतही संस्कारांच्या रूपाने शिल्लक उरलेलेच आहेत, व ते असणारही आहेत. कारण, राज्य ही संकल्पना दरबार व दरबाऱ्यांच्या अभावी अस्तित्वातच येत नाही, ही वस्तुस्थिती आहे. तेव्हा, इतिहास राज्यांचाच आहे व तो तसाच असतो. म्हणून, इतिहासापासून शिकण्यासारखे फक्त लढाया कशा कराव्यात, आक्रमण कसे करावे, विजय संपादन करण्यासाठी कोणत्या क्लृप्त्या लढवाव्यात, गनिमी कावा कसा साधावा व राज्यविस्तार कसा करावा याच सर्व बाबी आहेत. यातून मानवी समाजाला उपयुक्त ठरू शकेल असे काहीही घेण्यासारखे नसते व नाही. म्हणून, इतिहासातून राजे, राज्यकर्ते व राजकारणच प्रतिष्ठित केले गेले आहे. लोकजीवनाला समृद्ध करणाऱ्या बाबी दुर्लक्षित केल्या गेल्या आहेत.

विनोबा पदयात्रा करीत भारताच्या पहिल्या राष्ट्रीय नियोजन मंडळाच्या निमंत्रणावरून (१९५१) सल्ला देण्यासाठी दिल्लीला पोहोचले होते. त्या आधी दिल्लीच्या आसपास असलेल्या गावांतून त्यांची रोजच प्रार्थना सभा होत असे व त्यात शेवटी विनोबांचे प्रवचनही होत असे. अशाच एका खेड्यात विनोबांचे प्रवचन झाले. त्यात त्यांनी उपस्थित लोकांना "अकबर बादशहा होऊन गेला त्याचे नाव ऐकले आहे काय" असा प्रश्न विचारला होता. लोकांनी उत्तर दिले की, "अकबर बादशहाचे नाव ऐकले नाही. पण, अल्ला हो अकबर ऐकत आलो आहोत." नंतर पुन्हा एक प्रश्न लोकांना विनोबांनी विचारला होता. त्यात त्यांनी "कबीराचे नाव ऐकले आहे काय" म्हटले होते. लोकांनी लगेच होकारार्थी उत्तर दिले होते. त्यात लोकांनी म्हटले होते की, "कबीर महान संत होऊन गेला आहे." पंडित जवाहरलाल नेहरू यांनी 'डिस्कव्हरी ऑफ इंडिया' भारताचा शोध हा ग्रंथ लिहिला आहे. त्यात त्यांनी 'बादशहा अकबराच्या काळात कबीर होऊन गेला' असे म्हटले आहे. बादशहा अकबराला लोक ओळखत नाहीत. त्याचा काळ कसा असेल. संत कबीराला लोक ओळखतात. म्हणून काळ कबीराचा होता अकबराचा नव्हता. तेव्हा, इतिहास असा वस्तुस्थितीचा विपर्यास करणारा असतो. जे नाही त्याला आहे म्हणावयाचे व जे आहे त्याला नाही म्हणावयाचे. हीं इतिहासाची रीत आहे जी सत्याधारित नाही. म्हणून, समाजजीवनाला राज्यांच्या इतिहासापासून जगण्याची प्रेरणा मिळत नसते व नाही. कबीरासारख्या संतांपासूनच लोकांना जगण्याची प्रेरणा मिळते व मिळत असते. म्हणून, इतिहास वाचणे, शिकणे, लक्षात ठेवणे हे सर्वसमाजजीवन घडवण्याच्या कामी फारसे उपयोगाचे नसते. तरीही इतिहासाचे महत्त्व लक्षात घेऊन ते जाणून घ्यावे असे म्हटले जाते. तशातही इतिहास खराखुरा असण्याची शक्यता व खात्री असेल, तर तो शिकायला हरकत नसावी व नाहीही पण, याची खात्री देता येत नाही. म्हणून, इतिहासातून जे शिकले जाते ते पूर्वग्रहांना वाव देणारे व ते घट्ट करणारेच असते व असू शकते, असेच शेवटी म्हणावेही लागते! म्हणून, मुलांना इतिहास शिकवला जाऊ नये, असे विनोबा म्हणायचे. कारण, मुले मनाने सरळ असतात. त्यांच्या मनात पूर्वग्रह नसतात. त्यांना इतिहास शिकवला की, त्यांच्या मनात पूर्वग्रह प्रवेश करतो, व तो चित्तात ठाण मांडून बसतो. म्हणून, सारासार विचार करण्याची पात्रता जी मुळात असते तीच नाहीशी केली जाते. पूर्वग्रहांना उजाळा देऊन ते मनात घट्ट होऊ नयेत, असे जर वाटत असेल, तर इतिहास शिकू नये व लक्षात असलेला इतिहास विसरायला शिकायला हवे, असे म्हणता येईल व म्हणायला हवे!

**आस्था-अनास्थेचा इतिहास**

धर्म-संप्रदायांच्या आस्थेतूनही इतिहास लिहिला जातो. जो मुळात इतिहासच नाही त्यालाही इतिहास म्हणण्याची सवय धर्म-संप्रदाय समाजाला लावतात. कारण, धर्म-संप्रदायांच्या ग्रंथांमधून, ज्यांना धर्म-ग्रंथच म्हटले जाते त्यातल्या व्यक्ती वा पात्रांना समाजजीवनात महत्त्वाचे स्थान मिळावे म्हणून धडपड केली जाते. यासाठी दंतकथा निर्माण केल्या जातात. आवडीच्या इतिहासातल्या राजा-महाराजांच्या बाबतीतही दंतकथा पसरवून मुळात नसलेली महानता त्यांना चिकटवली जाते. म्हणून, इतिहासात ज्यांना महापुरुष मानूनच गौरवले जाते त्यांच्या सभोवती धर्म-संप्रदायांच्या मतांना पुष्ट करण्यासाठी महानतेचे वलय निर्माण केले जाते. ज्याला इतिहास म्हणता येत नाही किंवा काव्य ग्रंथ म्हणूनच जे लिहिले गेले आहेत, त्यातल्या व्यक्ती व पात्रेही इतिहासातल्या मानूनच त्यांची चरित्रे

लोकमानसावर बिंबवल्या जातात व त्यांना प्रतिष्ठित केले जाते. म्हणून, इतिहासातल्या व्यक्ती व महाकाव्यातल्या व्यक्तीही धर्म संप्रदायांना हव्या त्या दृष्टीने महानतेला पोहोचवल्या जातात. यातून सत्यासत्य उलगडण्यासाठी जेव्हा चिकित्सा केली जाते, तेव्हा त्यातून वाद निर्माण होतात. इतिहासातले ते वाद अद्याप सुरूच आहेत व या वादातून समाज अनेक मतात विभक्त होऊन तो विघटित होत जातो आहे. यातून मतामतांतराचे संप्रदाय निर्माण होतात व यातली भांडणे युद्धाचे तसेच धर्म-युद्धाचे रूपही घेतात. हे रूप सध्या जगातल्या मनुष्य समूहात भय वाढवण्यासाठी कारणीभूत झालेले आहे. भारतात हिन्दुराष्ट्रवादी व त्यांचे 'धर्म-युद्ध' इस्लामी व त्यांचा 'जेहाद' शिखांचा खालिस्तान व खालीस्तानी आक्रमकवाद, हिन्दुधर्मातला शिवपंथ-विष्णुपंथांमधला वाद अशा अनेक परीने सांप्रदायिक मतमतांतरातून जो हिंसक संघर्ष सुरू असलेला दिसतो आहे त्याचा इतिहास धर्म-ग्रंथे व महाकाव्ये या मधल्या व्यक्तिचित्रणातल्या अतिशयोक्तीपूर्ण चरित्राच्या वर्णनातून निपजलेला आहे, व तो अंतहीन झालेलाही आहे. तेव्हा, इतिहासाविषयी बाळगली जाणारी आस्था ही अंतिमतः घातकच ठरत असेल, तर ही आस्था बाळगायचीच कशाला म्हणजे ती बाळगलीच जाऊ नये, असेच शेवटी म्हणावेही लागते! पण, इतिहासाचा खरा वा खोटा अभिमान बाळगल्या शिवाय जगणे निरर्थक होत असते, असे मानले जाते. म्हणजे मनुष्य समूहातल्या मनुष्य वंशाचा आदर हा अभिमान बाळगल्याविना करताच येत नाही, असेच मानलेही जाते आहे! पूर्वजांविषयी व त्यांच्या वंशाविषयी आदर व आस्था बाळगून ती व्यक्त करणे, तसेच मनुष्य समूहात त्यांचे स्मरण होत राहावे म्हणून जी काही दृष्टी बाळगायला हवी असते, ती निश्चितच बाळगली जाऊ शकते व बाळगायलाही हवीच. कारण, मनुष्य समूहांना जगण्याची व उज्ज्वल भविष्य घडवण्याची प्रेरणा यातून मिळते व मिळूच शकते हे मान्यच करायला हवे व मान्य केलेही जाते. पण, याची एक दृष्टी आहे व ती निरंतर स्वच्छ ठेवायलाही हवी आहे!

**इतिहासाचे सारतत्त्व**

इतिहास असो वा महाकाव्ये असोत, मनुष्य जीवनाचा निरंतर वाहत राहणारा तो प्रवाहच असतो व आहे. म्हणून, याला 'जीवन प्रवाह' म्हटलेही जाते. पण, या प्रवाहातली जी निरंतरता आहे, ती जीवन शुद्धीची एक प्रक्रियाच झालेली आहे, व ती तशीच असू शकते व असावीही लागते. वाहत राहणारा जलप्रवाह शुद्धिकरणाचाच असतो ज्याला इंग्रजीत 'फिल्ट्रेशन' म्हटले जाते. ही प्रक्रिया नैसर्गिक आहे. म्हणून ती हाताळताना त्यातून नैसर्गिकता नाहीशी होऊ नये याची काळजी वा दक्षता घ्यायला हवीच असते. ती कशी घ्यावी हा या बाबतीतला प्रश्न आहे, व तो सहज आकलन होण्यासारखाही आहे. या ठिकाणी ग्रह-पूर्वग्रह या सर्वातून मुक्त राहण्याची गरज असते. म्हणून, ग्रह-पूर्वग्रहातून वेगळे होऊन यावर विचार करायला हवा. जीवनातल्या वाहत्या प्रवाहातल्या निरंतरतेचे एक असे तत्त्व आहे ज्याला 'सारतत्त्व' म्हटले जाते. जीवन सारभूत असावे म्हणजे जे घेण्यासारखे असते व आहे तेच घेत राहावे हीच यातली निरंतरता आहे. म्हणून, जीवन प्रवाहातले 'सारभूत तत्त्व' काय आहे, याची ओळख पटायला हवी असते!

**गुण-अवगुणातली अतिशयोक्ती**

ज्यांनी इतिहास घडवला त्यांना इतिहास-पुरुष म्हटले जाते. यात स्त्री-पुरुष असा भेद नाही. पुरुषांबरोबरीने स्त्रीचेही कर्तृत्व असते व आहे. म्हणून, पुरुषार्थ शब्द पुरुष व स्त्रियांना एकाच अर्थाने लागू पडतो. अशा व्यक्ती इतिहासावर आस्था ठेवणाऱ्यांना आकर्षित करतात. म्हणजे त्यांचे व्यक्तिमत्त्व आकर्षित करते. या आकर्षणात इतिहासातल्या व्यक्तिंचे प्रामुख्याने गुणवर्णन महत्त्वाचे होत असते. आकर्षणामुळेच गुणवर्णन केलेही जाते. पण, यात मुळात नसलेले गुणही इतिहासातल्या कर्तृत्ववान व्यक्तींना चिकटवले जातात. कारण, याविषयी एक आस्था व श्रद्धा होऊन बसलेली असते व आहे. म्हणून, इतिहासातल्या कर्तृत्ववान व्यक्ती त्यांच्या कर्तृत्वाने श्रेष्ठपदाला चढत असल्या तरी आस्था व श्रद्धेच्या आवरणातच हे श्रेष्ठ पद उजळवीत ते चमकदार केलेही जाते. अशा महापुरुषांना गुणवत्तेच्या शिखरावर नेऊन बसवले जाते. यातून त्याच्यातल्या अवगुणांचा विसर पडावा म्हणून उपाययोजनाही केलीच जाते. ती करावीही लागते. म्हणून,

इतिहासातली महाव्यक्ती गुणवंतच असते, तिच्यात अवगुण नसतातच अशी एक धारणा करूनच ती पसरवीत राहावे लागते. पण, यामुळे परिणामतः अवगुण अधिकाधिक घातक होत असतात. अर्थात, याचे भान ठेवले जात नाही. याच्या अतिशयोक्तीतूनच अवगुण पाहणाऱ्यांना संधी उपलब्ध होत असते. गुण व अवगुण कालसापेक्ष असतात. सर्वकाली ते स्वीकारायचे नसतात. पण, अतिशयोक्तीमुळे कालसापेक्षता विसरून त्याचे सार्वकालीन महत्त्व लोकमानसावर बिंबवण्याचा प्रयत्न केला जातो. यातून ज्या काही प्रतिक्रिया होत असतात त्यातूनच अवगुण पाहण्याला सुरुवात केली जाते. जसे गुणदर्शनात अतिशयोक्ती केली जाते व नसलेले गुण चिकटवले जातात, तसेच अवगुण पाहण्याच्या अतिशयोक्तीतूनही नसलेले अवगुण चिकटवले जातात. यामुळे इतिहासातल्या महान ठरवल्या गेलेल्या व्यक्ती वादग्रस्त ठरतात. म्हणून, यांचा इतिहासही वादग्रस्त होतो. याच कारणाने इतिहास नेहमीच वादग्रस्त राहिलेलाही आहे. या दृष्टीने महाराष्ट्रात छत्रपती शिवाजी महाराजांची व मराठा इतिहासाची ज्या एका पद्धतीने दखल घेतली जाते त्यातून निर्माण झालेले वाद विकोपाला गेल्याचे व जात असल्याचे आढळून येते. यातून आस्था व अनास्थांचे स्वीकारण्याच्या व नाकारण्याच्या प्रतिक्रिया होत असतात. यामुळे अप्रिय अशांतीच्या व हिंसेच्या घटना घडतात. म्हणून, इतिहासाला जरी महत्त्व दिले जाते, तरी इतिहासातल्या महान समजलेल्या पराक्रमी व्यक्तींच्याविषयी आस्था व अनास्था दाखवण्यातून जी विघातक कृत्ये केली जातात त्याकडे दुर्लक्ष करून चालत नाही. अर्थात, इतिहासाविषयी अतिशयोक्तीतल्या आस्था व अनास्थांचा दुर्व्यवहार टाळायलाच हवा असतो! कारण, या दुर्व्यवहारामुळे इतिहासातून ग्रह व पूर्वग्रहच शिल्लक उरतात, सत्यनिष्ठा उरतच नाही. म्हणूनच असा इतिहास विसरायचा असतो व विसरायला हवाच! यामुळे इतिहासातल्या महान व्यक्ती व त्यांचा पराक्रम विसरला जात नाही. सारगर्भ करूनच महान व्यक्ती व त्यांचा पराक्रम स्वीकारण्याची प्रवृत्ती वाढवता येऊ शकते, व ती वाढतच असते!

**इतिहासाला गोंजारणारे संप्रदाय**

इतिहास व इतिहासातले पराक्रम कालसापेक्षच असतात. म्हणून, सर्वच काळात त्यांचे अनुकरण करता येत नाही व करूही नये. कारण, असे कोणतेच अनुकरण उपयोगी ठरत नाही व ठरत नसते. म्हणून, अकारण इतिहासाला गोंजारण्यात वेळ वाया घालवू नये हेच उत्तम. पण, हे शक्य होताना दिसत नाही. कारण, इतिहासाच्या आस्थेचे व अनास्थेचेही जे संप्रदाय उभे होत असतात व झालेच आहेत, ते इतिहासाला गोंजारण्यासाठीच असतात व आहेत. रामायण व महाभारतासारख्या महाकाव्यांचेही असे झालेच आहे. रामायण व महाभारताला इतिहास मानायचा की नाही, असा वाद सुरूच आहे. रामायण-महाभारत महाकाव्येच आहेत, व महाकवींच्या प्रतिभेतून सुष्ट कल्पनांचा तो विस्तार व विलास आहे, असे सांगितले जाते. पण, यातली पात्रे भारतीय समाज जीवनाशी इतकी एकरूप झालेली आहेत, की त्यांना ऐतिहासिक मानूनच त्यांचे पूजन केले जाते. म्हणजे यातून या पात्रांना देवताच मानले गेले आहे. रामायणातला पुरुषोत्तम राम व महाभारतातला योगेश्वर श्रीकृष्ण भारतीय लोकजीवनात श्रद्धा व भक्तीनेच पूजले जातात. पण, याचे संप्रदाय निर्माण झाल्यामुळे, यांना जे मानतच नाहीत अशांचेही संप्रदाय निर्माण होऊ शकले आहेत. हे संप्रदाय राम व कृष्ण या दोघांमधले दोष पाहून त्यांच्याविषयी जनमानसात विपरीत भावना वाढीसाठी उत्तेजन देतात. यातून नुसते वादच निर्माण झालेले नाहीत तर रक्तांचे पाट वाहणारी युद्धेही झालेली आहेत, ती होतच असतात. अद्याप यात खंड पडलेला नाही. म्हणून, इतिहास असो वा महाकाव्ये असोत, यांच्याकडे कसे पाहावयाचे, काय स्वीकारायचे, तसेच काय नाकारायचे याचा सारासार विचार करावाच लागतो व तो करावयाला हवाच! म्हणून, यातल्या तर्कशुद्ध व सारभूत वाटणाऱ्या गोष्टीच तेवढ्या स्वीकारायच्या असतात व बाकीच्या टाळायच्या असतात. अर्थात, इतिहासाचे व महाकाव्यांचे सारच तेवढे महत्त्वाचे मानून त्याचे सारग्रहण करण्यावरच भर द्यायला हवा, व याचीच मानसिकता तयार करायलाही हवी. यामुळे कालानुरूप जे नाही ते विसरता येते व जे कालानुरूप आहे ते स्मृतीत साठवून ठेवता येऊ शकते व ठेवायला हवे. म्हणून, इतिहास आणि महाकाव्यांच्या बाबतीत त्यांचा सारच महत्त्वाचा असतो व आहे. बाकीचे सर्व

उरलेले विस्मरणात ढकलून द्यायचे असते. याचाच अभ्यास करायला हवा. पण, जे स्वीकारण्याजोगे असते व आहे, ते स्वीकारण्याचाही अभ्यास करायला हवा. यामुळे इतिहासाचे व महाकाव्याचे गुणसंवर्धन होईल, व यामुळे मनुष्य समूहांना विवेकशील होताही येईल!

**उपसंहार**

'सार' शब्द महत्त्वाचा आहे. 'जीवन सार' हेच मनुष्य जीवनाचे 'सार' ठरवले गेलेही आहे. याचा 'राम' शब्दाशी सरळ संबंध आहे. एखादी बाब पटली नाही वा मान्य झाली नाही तर 'यात राम नाही' असे सहजच म्हटले जाते. या म्हणण्याचा अर्थ 'यात सार नाही' असाच केला जातो. हनुमंताला सीतेने मोत्याची माळ भेट म्हणून दिली. ती हातात घेऊन हनुमान त्यातला एकेक मोती दातांनी फोडून त्यात 'राम' पाहू लागला. सीतेने विचारले 'असे का करतोस' तर हनुमान उत्तरला 'मोत्यात राम आहे का हे मी पाहतो आहे. पण, या मोत्यात राम दिसत नाही.' हे एक रूपक आहे, पण ते अर्थवादी आहे. ज्यात 'राम' नाही ते स्वीकारायचेच नाही, असे यात मानले गेले आहे. तेव्हा, कोणत्याही गोष्टीतले 'सार' हेच महत्त्वाचे असते. म्हणून, ते स्वीकारण्याजोगे मानायचे व बाकीचे टाकून देण्याच्या योग्यतेचे मानायचे, असा याचा आशय आहे. तेव्हा, जे काही सारभूत आहे त्यातूनच जीवन घडत असते म्हणून ते घडवायचेही असतेच. इतिहासाचे व इतिहासाइतकेच महत्त्व महाकाव्यांना दिले गेले आहे. त्याचेही सारच स्वीकारायचे असते. बाकीची व्याप्ती सोडून द्यायची असते!

☆☆☆

# स्वतंत्र विदर्भ राज्य-ध्यास, विचार आणि चळवळ

प्रा. द. ना. धनागरे

भारतातील भाषावार प्रांतरचना किंवा पुनर्रचनेचा विषय तसा बराच जुना आहे. या संदर्भातील मांडणी प्रथम बिहारमध्ये महेश नारायण आणि नंतर त्यांचे राजकीय उत्तराधिकारी बाबू सच्चिदानंद सिन्हा यांनी १९१२मध्ये केली. १९०५मध्ये बंगालची फाळणी झाल्यानंतर देशभर त्याच्या विरोधात वंगभंगाची चळवळ सुरू झाली आणि त्या चळवळीचाच एक भाग म्हणून बंगाल प्रांतापासून बिहार हा वेगळा स्वतंत्र प्रांत स्थापन केला गेला. योगायोग असा- १२ मे १९१२मध्येच बापूजी अणे यांनी न. चिं. केळकर यांना पत्र लिहून 'मध्यप्रांताला (१९०३मध्ये) जोडल्या गेलेल्या निझामच्या अधिपत्याखालील वऱ्हाडच्या जिल्ह्यांचा स्वतंत्र मराठी भाषिक प्रांत व्हावा', यासंबंधी तात्यासाहेब केळकरांनी 'केसरी'त लेख लिहावा, अशी कळकळीची विनंती केली होती. १८०३पासून प्रथम वऱ्हाडचा प्रदेश ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीने गाविलगडच्या युद्धात 'ड्यूक ऑफ वेलिंगटन'च्या सैनिकी नेतृत्वाखाली जिंकला. त्यावेळी हैद्राबादच्या निझामाने ब्रिटिशांना मदत केली. त्याबद्दल भेट नजराणा म्हणून ब्रिटिशांनी हें जिल्हे निझामाला दिले. तेव्हापासून कधी निझामाकडे, कधी भाडेतत्त्वावर ब्रिटिशांकडे, मग पुन्हा निझामाचे सार्वभौमत्व (वऱ्हाडवर) मान्य करून सर्व प्रशासनासाठी वऱ्हाडचे जिल्हे मध्यप्रांताला जोडले गेले, अशी फरफट वऱ्हाडला अनुभवावी लागली होती (या. मा. काळे, १९२८, पृ. २१९-३९). त्या पार्श्वभूमीवर बापूजी अणे यांनी 'मराठी भाषिकांचा स्वतंत्र 'वऱ्हाड प्रांत' व्हावा, असे होत नसेल, तर निदान सर्व मराठी भाषिकांचा महाराष्ट्र प्रांत होण्याच्या दृष्टीने तात्यासाहेब केळकरांनी एक महाराष्ट्रीय परिषद आयोजित करावी', असे आवाहन त्या पत्रात केले होते (केळकर पत्रव्यवहार, केळकर, १९४१, पत्र क्र. १८६ आणि २६५, पृ. अनुक्रमे ८२-८३ व ११०).

लगेच १९१३मध्ये 'हैदराबाद संस्थानने वर्ग केलेले जिल्हे' (Hyderabad Assigned Districts) असा शिक्का मारून वऱ्हाडचे जिल्हे मध्यप्रांताला जोडले गेले आणि त्याचवर्षी तोपर्यंत आयुक्ताच्या (कमिशनरच्या) प्रशासनाखाली असलेल्या मध्यप्रांत-वऱ्हाडला 'गव्हर्नरचा प्रांत' असा दर्जा मिळाला; पण ही पुनर्रचना करताना 'भाषावार' प्रांतरचनेचे धोरण स्वीकारले गेले नव्हते. कारण ओरिसाला स्वतंत्र 'एका भाषेचा एक प्रांत' अशी मान्यता १९३७पर्यंत मिळाली नाही. १९११मध्ये बंगालचे विभाजन रद्द केले गेले; पण ते करताना बिहार वेगळा प्रांत केला गेला; मात्र बिहारपासून वेगळा ओरिसा प्रांत व्हायला १९३७ हे वर्ष उजाडावे लागले. याचप्रमाणे जगड्व्याळ असलेल्या मुंबई इलाख्यातसुद्धा सिंध आणि कर्नाटक हे अनुक्रमे सिंधी आणि कन्नड भाषिकांचे प्रदेश वेगळे करून त्याचे स्वतंत्र प्रांत केले जावेत, या मागणीसाठी आंदोलने सुरू झाली होती. शिवाय मद्रास प्रांतात कृष्णा, गुंटूर, पूर्व आणि पश्चिम गोदावरी हे चार तेलगू भाषिक जिल्हे (ज्यांना Northern Sircar Districts म्हणत असत) होते. निझामाकडे असलेल्या तेलंगणाच्या नऊ जिल्ह्यांबरोबर एकीकरण होऊन आंध्र हा स्वतंत्र तेलगू भाषिक प्रांत व्हावा, अशी मागणी १९४५-४६च्या सुमारास जोर धरू लागली होती. मुख्य म्हणजे राष्ट्रीय काँग्रेस आणि स्वातंत्र्याच्या चळवळीपासून वेगळेपण राखून भाषा-वर प्रांतरचनेसाठी आवाज उठवला जात होता, चळवळी-द्वारा जनमत तयार करणे सुरू होते (सीतारामैय्या, १९४६, पृ.१-६). बहुभाषिक प्रांतांच्या प्रशासनात समस्या येत होत्या आणि स्वातंत्र्याच्या लढ्यातसुद्धा हा प्रश्न अधूनमधून डोकावत होताच. 'भाषावार प्रांतरचना व्हावी का' या प्रश्नाचा विचार करून शिफारस करण्यासाठी घटना समितीचे अध्यक्ष बाबू राजेंद्रप्रसाद यांनी 'दार कमिशन' नेमले; पण त्याच्या अहवालावर संतप्त प्रतिक्रिया उमटल्याने तो काँग्रेसनेच स्वीकारला नाही (पेंडसे, २०१०, पृ. ३०-३४)

कॅबिनेट मिशनने १६ मे १९४६मध्ये एक आदेशवजा








पत्रक काढले होते. त्यात हंगामी राज्यघटना अस्तित्वात आल्याचे जाहीर केले; मात्र या घटनेत पुढील दहा वर्षे बदल केला जाऊ नये/करता येणार नाही, असेही स्पष्टपणे नमूद केले होते. त्याआधी जेव्हा (Government of India Act-1919) संमत झाला, तेव्हा गर्व्हनर जनरल (व्हॉईसरॉय) यांना सध्या अस्तित्वात असलेल्या प्रशासकीय प्रांताच्या सीमारेषा बदलण्यासाठी अधिकार कलम क्र. ६० अन्वये खरे तर दिले गेले होते. तेच अधिकार नंतर (Government of India Act Provincial Autonomy) १९३५ मधील कलम २९०मध्ये अधिक व्यापक करण्यात आले होते. तसे पाहिल्यास भारतीय राष्ट्रीय काँग्रेसने डिसेंबर १९२०मध्ये नागपूर येथील अधिवेशनातच भाषावार प्रांतरचनेच्या धोरणाला तत्त्वत: मान्यता दिली होती (सीतारामैय्या, १९४६, पूर्वोल्लेखित, पृष्ठे ७-९). १९३६-३७मध्ये प्रांतिक स्वायतत्तेच्या कायद्याला अनुसरून निवडणुका झाल्या. प्रांतिक सरकार सात प्रांतामध्ये काँग्रेसने (बहुमत मिळवल्याने) स्थापन केल्यानंतर परत एकदा प्रांतांच्या भाषिक पुनर्रचनेचा प्रश्न पुढे केला गेला. मध्यप्रांत वऱ्हाड (C. P. & Berar)च्या प्रांतिक कायदेमंडळाने १ ऑक्टोबर १९३८ रोजी 'मराठी भाषिक वऱ्हाड आणि नागपूर' जिल्ह्यांचा मिळून 'विदर्भ' असा नवा प्रांत निर्माण केला जावा, अशा आशयाचा ठराव संमत करून तशी शिफारस ब्रिटिश सरकारकडे केली (महाविदर्भ सभा, १९४३, पृष्ठे २८-३३). एवढेच नाही, तर 'महाविदर्भ सभा' अशी संस्था स्थापन करून तिची २८ मार्च १९४५ रोजी रीतसर नोंदणीसुद्धा केली.

स्वतंत्र विदर्भ राज्यासाठी १९३१च्या सर्वपक्षीय अणे समितीने गोलमेज परिषदेसाठी तयार केलेल्या अहवालापासून मोर्चेबांधणीला सुरुवात झाली आणि १९४३मध्ये 'महाविदर्भ सभा' स्थापनेने तिला संस्थात्मक चौकटही दिली. हे सर्व जरी खरे असले, तरी १९४० ते १९४६ या दरम्यान राष्ट्रीय काँग्रेस क्रिप्स मिशन, कॅबिनेट मिशन, घटना परिषदेच्या निवडणुका आणि स्वातंत्र्यप्राप्तीच्या मुख्य ध्येयप्राप्तीसाठीच्या वाटाघाटीत इतकी व्यस्त होती की, प्रांतीय पुनर्रचनेचा मुद्दा उपस्थित करण्याच्या मन:-स्थितीत काँग्रेसचे ज्येष्ठ पुढारी अजिबात नव्हते. शिवाय १९४३सालचा देशातील भीषण दुष्काळ (ज्यात १५ ते २० लाख लोक मृत्यू पावले), दुसरे महायुद्ध आणि 'चले जाव' आंदोलन-त्यात झालेली धरपकड इत्यादी राजकीय उलथापालथीमुळे काँग्रेसला उसंत नव्हती; पण मग १९४५च्या उत्तरार्धात युद्ध संपले आणि १९४६च्या सुरुवातीला केंद्रीय आणि प्रांतीय विधिमंडळाच्या निवडणुका काँग्रेसने लढविल्या. त्यावेळी निवडणूक जाहीरनाम्यात भाषावार प्रांतरचनेचा कार्यक्रम काँग्रेस सरकार हाती घेईल, याचा स्पष्ट उल्लेख होता (सीतारामैय्या, १९४६, पृष्ठ १०-११). निवडणुकीत काँग्रेसने भरघोस यश मिळविल्याने एका अर्थी प्रसिद्ध केलेल्या जाहीरनाम्याला मतदारांनी पसंती दर्शविली होती. घटना परिषदेचे पहिले अधिवेशन ९ डिसेंबर १९४६ रोजी व्हायचे ठरले. त्याच सुमारास कॅबिनेट मिशनने एक पत्रक प्रसिद्ध केले होते. त्यात पोटकलम ५, परिच्छेद १९मध्ये असे म्हटले की,

"The Sections (Groups A, B, C) shall proceed to settle the Provincial constitutions for all provinces ..... Provinces shall have the power to opt out of the groups in accordance with the provisions of Sub-Clause 8"

हे पोटकलम ८ खालीलप्रमाणे होते.

'Sub-clause 8: Division of a province to opt out of a group constitution etc. shall be taken up by the new legislature of the province after the first general elections (in 1952) under the new constitution' (सीतारामैय्या, १९४६, पूर्वोल्लेखित, पृष्ठे ११-१२).'

याचा अर्थ स्पष्ट होता की, प्रांतीय पुनर्रचनेचा प्रश्न भारतीय संघराज्याची नवी राज्यघटना (संविधान) जानेवारी १९५०मध्ये स्वीकारल्यानंतरच केंद्रशासन हाती घेऊ शकेल. प्रांतांची पुनर्रचना करण्यासाठी एक उच्चस्तरीय समिती नेमून तिने योग्य त्या शिफारशी शासनाला करावयाच्या होत्या. प्रांतांची पुनर्रचना करताना प्रत्येक प्रांताची एक भाषा असावी, त्याची सांस्कृतिक वैशिष्ट्ये, इतिहास आणि अस्मिता जोपासली जावी, एवढेच राज्याच्या एकसंधतेसाठी पुरेसे नाही. त्यासाठी प्रत्येक राज्य वित्तीय








आणि आर्थिकदृष्ट्या स्वयंपूर्ण असेल, अशी पुष्टीही जोडली गेली होती. या मार्गदर्शक तत्त्वांसहित प्रांतांच्या पुनर्रचनेचा ठराव घटना परिषदेच्या उद्‌घाटनाच्या अधिवेशनातच स्वीकारला गेला. त्यामुळे खऱ्या अर्थाने स्वातंत्र्य प्राप्तीनंतरच स्वतंत्र विदर्भ राज्यासाठीचा लढा १९५०च्या दशकात सुरू झाला. फाझल अली, सरदार के. एम. पणिक्कर आणि पंडित हृदयनाथ कुंझरू या त्रिसदस्यीय 'भाषावर प्रांतरचने'साठी नेमलेल्या राज्य पुनर्रचना आयोगाने १९५५मध्ये अहवाल सादर केला. त्यात विदर्भासाठी स्वतंत्र राज्य असावे, अशी शिफारस केली गेली होती; तरीही १९५६मध्ये प्रांतांची जी पुनर्रचना झाली, त्यात मुंबईसह गुजरात, पश्चिम महाराष्ट्र, कोकण, मराठवाडा आणि विदर्भ असे मिळून द्विभाषिक राज्य अस्तित्वात आले. त्याला संयुक्त महाराष्ट्र समितीने प्रखर विरोध केला; त्याचप्रमाणे महाराष्ट्र काँग्रेसमधील भाऊसाहेब हिरे यांच्या नेतृत्वाखालील गटानेही विरोध केला होता (पेंडसे, २०१०, पृ. ११); मात्र संयुक्त महाराष्ट्रसाठीच्या आंदोलनात तत्कालीन मुख्यमंत्री मोरारजी देसाई यांच्या राज्यशासनाने मुंबईत आंदोलकांवर केलेल्या गोळीबारात १०६ हुतात्मे झाले. त्यानंतरच मोररजीभाईंची केंद्रात रवानगी झाली.[१] आणि रणनीतीचा भाग म्हणून 'प्रथम द्विभाषिक स्वीकारावे' आणि मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र स्थापन केला जावा, यासाठी सत्तेत राहून परिणामकारक लढा द्यावा, अशी भूमिका घेणारे यशवंतरावजी चव्हाण १ मे १९६० मध्ये अस्तित्वात आलेल्या महाराष्ट्र राज्याचे शिल्पकार ठरले (तत्रैव, पृ. १६६). जर काँग्रेसमधील सर्व गटांनी (म्हणजे मुंबई प्रदेश काँग्रेस समिती आणि महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस कमिटीतील हिरे आणि चव्हाण गट यांनी एकत्रितपणे) द्विभाषिकाला विरोध केला असता, तर महाराष्ट्र स्थापनेच्या वेळी मुख्यमंत्रीपदाची माळ भाऊसाहेब हिरे यांच्या गळ्यातच पडली असती; पण अशा जर-तर च्या प्रश्नांना इतिहासात फारसे महत्त्व नसते.

द्विभाषिकाच्या निर्मितीच्या वेळी स्वतंत्र विदर्भाचा पाठपुरावा करणाऱ्या नेत्यांनी द्विभाषिकाला प्रखर असा विरोध केला नाही, असा आक्षेप संयुक्त महाराष्ट्रवाद्यांनी घेतला होता. तसा विरोध न करण्यामागची दोन कारणे होती. एक म्हणजे हिंदी भाषिक मध्यप्रांतापासून वेगळे होऊन पश्चिम विदर्भ (वऱ्हाडचे चार जिल्हे) आणि पूर्व विदर्भ (म्हणजे नागपूर कमिशनरच्या कार्यक्षेत्रातील चार जिल्हे) ह्या आठ मराठी भाषिक जिल्ह्यांना तात्पुरते का होईना वेगळे केले गेले. ह्या मराठी भाषिक प्रदेशाच्या महसुली उत्पन्नातील सिंहाचा वाटा हिंदी भाषिक मागासलेल्या प्रदेशाच्या विकासासाठी होतो, अशी तक्रार मध्यप्रांताच्या कायदेकौन्सिलात १९१६-१७ पासून, म्हणजे त्या प्रांताला स्वतंत्र विधिमंडळ मिळाल्यापासूनच केली जाऊ लागली होती. लोकनायक बापूजी अणे यांच्या नेतृत्वाखाली १९१५ मध्ये 'यवतमाळ डिस्ट्रिक्ट असोसिएशन' स्थापन केले गेले. त्याच धर्तीवर विदर्भातल्या सर्वच जिल्ह्यांत जिल्हा सभा स्थापन केल्या गेल्या. मोर्ले मिंटो सुधारणानंतर जे लोकप्रतिनिधी कायदेमंडळात निवडून गेले, त्यांनी 'विदर्भासाठी स्वतंत्र कूळ कायदा हवा, बिगारी निर्मूलन झाले पाहिजे, महार वतनांचा प्रश्न, जंगल जमिनीवरील हक्क' असे ऐरणीवरचे प्रश्न नागपूर येथील मध्यप्रांत-वऱ्हाड (सी. पी. अँड बेरार)च्या कायदेमंडळात उपस्थित करणे सुरू केले होते. एवढेच नाही, तर त्यांच्याच दबावामुळे गव्हर्नरांनी मि. सीम यांची समिती नेमून विदर्भातील वऱ्हाडच्या जमीन महसूल (भू राजस्व)चा किती हिस्सा वऱ्हाड-नागपूरवर खर्च होतो आणि किती अमराठी हिंदी भाषिक जिल्ह्यांवर होतो, याचा अभ्यास करून त्या महसुलाचे वाटप कोणत्या प्रमाणात होणे योग्य होईल, असे सूत्र (फॉर्म्यूला) ठरवण्यासाठी नेमली होती. तेव्हा सीम समितीने ६०:४० टक्के असे सूत्र सुचवले होते, म्हणजे ६० टक्के खर्च विदर्भ जिल्ह्यांवर व्हावा आणि फक्त ४० टक्के मध्यप्रांतातील इतर प्रशासनासाठी वापरावा, असे स्पष्टपणे सुचवले होते.[१] हा अहवाल १९२३च्या सुमारास तयार झाला; मात्र स्वातंत्र्यसाठीची देशव्यापी चळवळ आणि राजकीय घटना इतक्या वेगाने घडत गेल्या की, सीम फॉर्म्युला पाळला जातोय किंवा नाही याची शहानिशा करायला कोणालाच तेव्हा वेळ नव्हता. याचा उल्लेख आधी केला आहेच.

१९५६मध्ये द्विभाषिक राज्य निर्मितीला लोकनायक अणे आणि त्यांच्या नेतृत्वाखालील सर्वच विदर्भवाद्यांनी

फार विरोध केला नाही. याचे दुसरे कारण म्हणजे द्विभाषिकांच्या प्रयोगाला अणे यांचा तत्त्वतः 'प्रयोग' म्हणून विरोध नव्हता; पण तो प्रयोगच राहावा आणि पुढे जसे गुजरात स्वतंत्र राज्य अस्तित्वात आले, तसे विदर्भाचेही स्वतंत्र वेगळे राज्य अस्तित्वात यावे, हाच विदर्भवाद्यांचा त्या वेळी आग्रह होता. स्थूलमानाने विदर्भ आणि महाराष्ट्राची भाषा मराठी असली, तरी त्यांच्यात सांस्कृतिक फरक बराच आहे. त्या दोन भागांचा सांस्कृतिक, सामाजिक आणि प्रशासकीय इतिहास भिन्न आहे. त्या प्रदेशातील बोली भाषा आणि अपभाषा (dialects and slangs) भिन्न आहेत. महाराष्ट्रात रयतवारी पद्धतीची जमीन महसूल व्यवस्था आहे, तर विदर्भात (१९ व्या शतकाच्या पूर्वार्धातील) निझामाच्या सार्वभौम हक्कामुळे मालगुजारी, जहागीरदारी, इजारदारी आणि काही प्रमाणात रयतवारी पद्धती यांची संमिश्र व्यवस्था काहीशी गुंतागुंतीची होती. जातींची उतरंड आणि गावगाड्याची रचनाही पश्चिम महाराष्ट्रात वेगळी आणि विदर्भात वेगळी होती. बलुतेदारी दोन्हीकडे होती, आणि विदर्भामध्ये महार बलुतेदारालासुद्धा वतनाचा हक्क आणि दर्जा होता. पश्चिम महाराष्ट्रात बऱ्याच भागात बलुतेदारीचे रूपांतर वेठबिगारीत झाले होते. विदर्भातही तो प्रकार १९१५-१६च्या सुमारास सुरू झाला होता आणि त्याविरुद्ध लोकप्रतिनिधींनी प्रांतिक विधिमंडळात आवाज उठवणे सुरू केले होते.

### राज्य पुनर्रचना आयोगासमोर कैफियत

बापूजी अणे यांनी विदर्भ हा स्वतंत्र प्रांत व्हावा, यासाठी कोणत्या महत्त्वाच्या मुद्द्यांचा विचार राज्य पुनर्रचना आयोगाने केला पाहिजे, याची स्पष्ट मांडणी आयोगापुढे सादर केलेल्या 'कैफियती' (Memorandum) मध्ये केली आहे. ईस्ट इंडिया कंपनीच्या सरकारने लोकांकडून जमीन महसूल गोळा करणे आणि व्यापारातून भारताच्या अर्थव्यवस्थेची लूट सुरू ठेवण्याला आवश्यक तेवढी कायदा व सुव्यवस्था ठेवणे एवढीच प्रशासकीय भूमिका बजावली. त्या कामासाठी सोयीचे होईल, अशा पद्धतीने वेळ येईल तशी प्रांतरचना केली. त्या वेळी त्या त्या प्रदेशांचा इतिहास, नैसर्गिक, भौगोलिक परिस्थिती, तिथली भाषा, संस्कृती, सामाजिक संस्थात्मक चौकटींचा कधी गांभीर्याने विचारच केला नाही. त्यामुळे काही प्रदेशात विशेषतः बंगाल, बिहार, आसाम व ओरिसा यांच्यात परस्परांबद्दल कटुता निर्माण झाली. त्या प्रदेशांचे एक राज्य केल्याने आणि तो प्रयोग अनेक दशके राबवल्यानंतरही त्या जनतेमध्ये आपापसांत सामंजस्य निर्माण झाले नाही. याशिवाय एक भाषा आहे म्हणून वेगळा प्रांत केल्यानेही सर्व प्रश्न सुटत नाही किंवा समान भाषिकांमध्ये मैत्री व सद्भावना निर्माण होईलच, हेही सांगता येत नाही अन्यथा बंगाल प्रांताचे पूर्व आणि पश्चिम बंगाल असे दोन तुकडे भिन्न धार्मिक अस्मितांमुळे करावे लागले नसते (अणे, १९५४, पृष्ठे ३-५). त्याचप्रमाणे यू. पी., सी. पी. अँड बेरार आणि मुंबई या प्रांतांचाही विस्तार फार वाढल्याने तिथे प्रशासन कार्यक्षमतेने काम करू शकत नाही असा अनुभव आहे, हेसुद्धा बापूजी अणे यांनी त्यांच्या कैफियतीत आवर्जून म्हटले होते. आता प्रांतांची पुनर्रचना करताना एका भाषेचा एक प्रांत (राज्य) असे सूत्र न स्वीकारता (अ) प्रादेशिक सलगता (contuguity), (ब) सांस्कृतिक (cultural) आणि (क) भाषिक एकसंधता (homogeneity) या तीन निकषांचा आधार घेतला पाहिजे. एवढेच नाही, तर नव्या राज्यातील दूर सीमावर्ती भाग राज्याच्या राजधानीपासून ३०० मैलांपेक्षा अधिक अंतरावर असू नये आणि राज्याची लोकसंख्या ४० लाखांपेक्षा कमी किंवा १ कोटी ६० लाखांपेक्षा जास्त असू नये (अणे, पूर्वोल्लेखित, पृष्ठे ६-७).

राज्यनिर्मिती किंवा पुनर्रचना करताना हे सुद्धा ध्यानात ठेवले पाहिजे की, प्राचीन इतिहासात भारतात फार छोटी-छोटी राज्ये होती. त्यांचीच पुढे ब्रिटिश कालखंडात जशी शेकडो संस्थाने झाली, तशी ही राज्ये होऊ नयेत किंवा मोठा प्रदेश, पण लोकसंख्या खूपच कमी असलेली राज्येही निर्माण होणे देशाच्या हिताचे नाही. शिवाय नवीन राज्ये निर्माण करताना पुढे कालांतराने उपराष्ट्रीयतेची (Sub-Nationalism) भावना अंकुरित होणार नाही, याचीही काळजी घेतली पाहिजे. अन्यथा त्याद्वारे देशाच्या राष्ट्रीय एकात्मतेला बाधा निर्माण होऊ शकते. एक सक्षम आणि प्रशासकीय-व्यवस्थापकीयदृष्ट्या सोयीचे असे नवे राज्य असले पाहिजे, ही दक्षता घेणे गरजेचे आहे (पूर्वोल्लेखित, पृष्ठे ९-१०). एका अर्थी राज्यपुनर्-








चनेसाठीची मार्गदर्शक तत्त्वेच बापूजी अणे यांनी त्यांच्या कैफियतीत आयोगापुढे विशद केली होती.

ही सर्व पार्श्वभूमी सांगण्याची आज एवढ्यासाठी गरज आहे की, लोकनायक बापूजी अणे यांनी फाजल अली कमिशनसमोर 'विदर्भाची कैफियत' सादर केली. तीत विदर्भाच्या सांस्कृतिक आणि भाषिक, तसेच ऐतिहासिक अनुभवांच्या वेगळेपणावर भर दिला गेला आहे, हे खरे. अणे यांच्या ७४ पानी निवेदनातील पहिल्या २४ पृष्ठांमध्ये (एकतृतीयांश भागात) विदर्भाची सांस्कृतिक अस्मिता स्वतंत्र असल्याचाच मुद्दा त्यांनी अधोरेखित केला आहे; तरीही विदर्भातील अर्थव्यवस्था आणि व्यापार उद्योगाच्या भरभराटीसाठी त्या प्रदेशाला स्वायत्त राज्याचा दर्जा असणे कसे आवश्यक आहे आणि तसेच केल्यास आर्थिकदृष्ट्या विदर्भाचे राज्य स्वयंपूर्ण होण्याची क्षमता त्या प्रदेशात आहे, हा मुद्दा सुद्धा कैफियतीमध्ये आवर्जून तपशिलात जाऊन मांडला आहे (अणे यांची कैफियत, प्रकरण ११, पृष्ठे ४७-५६). याचा अर्थ असा होतो की, हिंदी भाषिकांपासून विदर्भाची सुटका झाली, हे चांगले झाले असले, तरीही जर विदर्भाला संयुक्त महाराष्ट्रास जोडले गेले (त्यात समाविष्ट केले गेले), तर विदर्भाचा आर्थिक विकास खुंटेल, ही भीती त्या कैफियतीमध्ये व्यक्त केली गेली होती. म्हणजे आगीतून निघून फुफाट्यात पडल्यासारखी विदर्भाची गत होऊ नये, अशीच लो.अणे यांची आग्रही भूमिका होती. ही धोक्याची सूचना त्यांनी फाजल अली आयोगाला स्पष्टपणे दिली होती.

महत्त्वाचे म्हणजे राज्य पुनर्रचना आयोग १९५३ मध्ये नेमला आणि विदर्भवाद्यांना जाग आली, असे झालेले नाही. मध्यप्रांत-वऱ्हाडला स्वतंत्र प्रांताचा दर्जा मिळाला (१९१३) आणि प्रांतिक कौन्सिल अस्तित्वात आले, तेव्हापासून 'सांस्कृतिक वेगळेपण' आणि 'आर्थिक स्वायत्ततेची गरज' या मुद्द्यांवर चर्चा विधिमंडळात आणि सार्वजनिक व्यासपीठावर (Public domain) सुरू झालेली होती, याचा उल्लेख झालेला आहेच. काही जाणकारांच्या मी अलीकडे मुलाखती घेतल्या. त्यात अशी महत्त्वाची माहिती मिळाली की, मध्यप्रांतात (त्यावेळच्या) (१९२० च्या सुमारास) एकूण मराठी भाषिक प्रदेश कोणते? त्यात मराठी भाषेचा दैनंदिन व्यवहारात उपयोग करणाऱ्यांची संख्या किती? असे सर्वेक्षण लोकनायक अणे यांच्या सूचनेवरून केले गेले होते. त्यावेळी बापूजी अणे यांचे धाकटे बंधू डॉ. यादवराव अणे आणि अन्य काही सहकाऱ्यांनी आज मध्यप्रदेशातील (महाराष्ट्राच्या) सीमावर्ती भागात म्हणजे बऱ्हाणपूर, नेमाड, खांडवा, बैतूल, छिंदवाडा, मुलपाती, भैसदेही इत्यादी ठिकाणी प्रत्यक्ष भेटी देऊन सर्वेक्षण केले आणि आकडेवारी एकत्रित केली (आधार, अरुण हळबे यांची मुलाखत; मोहनी, १९४३, पृ. १-५). कारण हा सीमावर्ती मराठी भाषिक प्रदेशही महाविदर्भ या प्रस्तावित राज्यात समाविष्ट व्हावा, ही बापूजी अणे यांची कल्पना १९२० पासूनच होती. ज्यांनी त्यांची कैफियत (मूळ इंग्रजीत) वाचली आहे, त्यांना हे स्मरत असेल की, तीत प्रस्तावित राज्याच्या नकाशात (अणे, १९५४, पृष्ठ २ आणि ३ याच्यामध्ये) हा भाग दाखवून महाविदर्भात हा भाग यावा, अशी भूमिका घेतली होती. आज सीमा प्रश्न हा फक्त बेळगाव-निपाणी-हुबळी-धारवाडपुरताच मर्यादित केला गेला आहे आणि अणे यांनी उपस्थित केलेल्या काही मराठी भाषिकांच्या सीमाप्रश्नाकडे मात्र पूर्णतः दुर्लक्ष झालेले आहे.

१९२३च्या सीम फॉर्म्युलानंतर महाविदर्भाच्या निर्मितीचा प्रश्न मध्यप्रांत-वऱ्हाडच्या कायदेमंडळात सतत पेटत ठेवला गेला आणि अखेर १ ऑक्टोबर १९३८ रोजी त्या विधिमंडळाने मराठी भाषिक प्रदेशाचा विदर्भ हा स्वतंत्र प्रांत स्थापन करून त्याला 'स्वतंत्र गव्हर्नराचा प्रांत' असा दर्जा लवकर दिला जावा, अशा आशयाचा ठराव एकमताने संमत केला.[3] स्वतंत्र विदर्भाच्या चळवळीचे नेतृत्व तेव्हापासूनच प्रामुख्याने पश्चिम विदर्भातील म्हणजे अमरावती, यवतमाळ इत्यादी या वऱ्हाडच्या जिल्ह्यातील पुढारी करत होते. तेव्हा हिंदी भाषिक प्रदेशातील मुख्यमंत्री-मंत्र्यांनी नागपूरकडील (पूर्व विदर्भातील) विधिमंडळातील मराठी भाषिक प्रतिनिधींना वऱ्हाडपासून वेगळे करण्याचे, त्यांच्यात फूट पाडण्याचे प्रयत्न केले. गटातटांचे राजकारण भारतात तसे बरेच जुने आहे; मात्र अपवाद वगळता सर्व विदर्भातील नेत्यांची एकजूट फाजल अली आयोग नेमला जाईपर्यंत कायम होती. याचे प्रत्यंतर १ ते ३ ऑक्टोबर १९४३मध्ये महाविदर्भ परिषद अमरावती येथे आयोजित केली होती आणि त्यात बॅरिस्टर मुकुंदराव

जयकरांना अध्यक्ष म्हणून निमंत्रित केले गेले. त्यांच्या अध्यक्षीय भाषणात त्यांनी सुरुवातीसच स्पष्टपणे मत व्यक्त केले,

'... in the demand you are making for a united province to be called 'Mahavidarbha' and to rank as a separate province under a Governor's administration, you have a strong case' (महाविदर्भ सभा, १९४३, पृ. २).

अर्थात बॅ. जयकरांचा 'महाविदर्भ' निर्मितीला एका मर्यादित अर्थानेच पाठिंबा होता. कारण संपूर्ण मराठी भाषिक सलग प्रदेश एका प्रांतात येण्याच्या दिशेने ते पहिले पाऊल ठरेल, असे त्यांना वाटत होते. याच अमरावती अधिवेशनात 'दि महाविदर्भ सभा, नागपूर' अशी संघटना स्थापना (१९४३) केली गेली. तिची घटना, उद्दिष्टे, पंधरा जणांचे नियामक मंडळ इत्यादींची घोषणा करण्यात आली. त्यात ज्या आठ कार्यकर्त्यांच्या स्वाक्षऱ्या आहेत, त्यात ग. त्र्यं. (भाऊसाहेब) माडखोलकरांचीही सही आहे (पूर्वोल्लेखित, पृष्ठ २८), हे विशेष! कारण द्विभाषिक राज्य स्थापनेनंतर ते कट्टर संयुक्त महाराष्ट्रवादी बनले.

या संदर्भात आणखी एक महत्त्वाच्या गोष्टीची नोंद घ्यायला पाहिजे. ती म्हणजे स्वातंत्र्यप्राप्तीची काही महिने (तीन महिने) आधी न. चिं. (तात्यासाहेब) केळकरांनी 'केसरी'मध्ये लेख लिहिला होता. त्यात त्यांनी असे स्पष्ट म्हटले होते की, 'वऱ्हाड-नागपूर (मध्यप्रांतात) प्रांतात समाविष्ट असल्याने त्याचे फार नुकसान होत आहे. म्हणून तो स्वतंत्र (प्रांत) व्हावा. मॉन्टेग्यू-चेम्सफर्ड कमिटी, सायमन कमिशन, गोलमेज परिषद इत्यादी पुढे हा दावा (वऱ्हाडच्या स्वातंत्र्याचा म्हणजे निझामाच्या तावडीतून सुटकेचा) मांडण्यात आला होता. म्हणून आता वऱ्हाड (विदर्भ) हा अखंड महाराष्ट्रात समाविष्ट व्हावा, ही सूचना गैरलागू ठरेल. वऱ्हाडच्या पुढाऱ्यांना वऱ्हाड पुणे-महाराष्ट्रात जोडण्याची खरी हौस मनातून वाटत असेल, तरच ती गोष्ट घडावी. यात पुणे-महाराष्ट्र खंडाचे वऱ्हाडच्या महाराष्ट्र खंडावर अतिक्रमण किंवा आग्रह न वाटावा. पुण्याला आधीच लोक नावे ठेवतात, त्यात ही भर नको. (विदर्भाला) अखंड महाराष्ट्रात येण्याची इच्छा नसली, तर त्याने स्वतंत्र राहावे. असे झाल्याने फार तर हिंदी (भारतीय) स्वराज्य घटनेत दोन मराठी प्रांत म्हणून एकाऐवजी दोन मते, असा कदाचित फायदाही होईल. ते काहीही असो, स्वतंत्र वऱ्हाडच्या चळवळीत महाराष्ट्र हा आनंदाने वऱ्हाडचाच पाठपुरावा करील' ('केसरी', अंक २ मे, १९४७, पृष्ठ २).[४]

स्वतंत्र विदर्भ राज्याच्या मागणीला फार मोठा धक्का राज्यपुनर्रचना आयोगाचा अहवाल सादर होण्यापूर्वीच मिळाला, तो बॅ. रामराव देशमुखांच्या संयुक्त महाराष्ट्राचे समर्थन करणाऱ्या एका वक्तव्याने. वास्तविक पाहता बॅ. रामराव हे दीर्घकाळ लो. बापूजी अणे यांच्यासोबत स्वतंत्र विदर्भ प्रांताची मागणी लावून धरण्यात अग्रेसर होते. अकोला करारावर त्यांनी सही केली होती आणि तो करार घडवून आणण्यातही त्यांचे योगदान मोठे होते. १९४८मध्ये महात्मा गांधीजींच्या हत्येनंतर संयुक्त महाराष्ट्र परिषदेत त्यांचे मुंबईत अध्यक्षीय भाषण झाले. त्यात त्यांनी आमचा विरोध मराठी भाषिकांच्या संयुक्त महाराष्ट्राला नाही; पण अकोला कराराप्रमाणे विदर्भाचा (महाकोसल पासून वेगळा) स्वतंत्र उपप्रांत आणि महाराष्ट्राचा उपप्रांत अशा दोघांचा मिळून जर संयुक्त महाराष्ट्र होणार असेल, तर तो आम्हाला हवा आहे. हैदराबादच्या निझामशाहीने आणि महाकोसलातील हिंदी भाषिकांनी विदर्भावर जो अन्याय केला, त्यामुळे विदर्भाच्या स्वतंत्र उपप्रांताची मागणी अकोला करारात केली होती. याचा बॅं. रामरावांनी त्या अधिवेशनात पुनरुच्चार केला होता (देशमुख, १९४८, पृष्ठे १८-२३); पण 'जर उपप्रांताची सोय भारताच्या राज्यघटनेत झाली नाही, तर आमची (विदर्भाची) निःसंदिग्ध निवड संयुक्त महाराष्ट्राच्या बाजूनेच होईल', असेही विधान त्यांनी मुंबई अधिवेशनात केले होते. बापूजी अणे यांची अशी भूमिका मुळीच नव्हती.

मात्र महाविदर्भाच्या कडव्या पुरस्कर्त्यांमध्ये ज्यांना आतापर्यंत गणले जात होते, त्यांनी राज्यपुनर्रचना आयोगाच्या नियुक्तीनंतर संयुक्त महाराष्ट्राचे समर्थन करणारे वक्तव्य केले. त्यात महाविदर्भ आर्थिकदृष्ट्या स्वयंपूर्ण होणार नाही आणि त्याला कर्जे काढावे लागतील. उलट एकच संयुक्त महाराष्ट्र झाल्यास एक राज्यपाल, एक सचिवालय असे झाल्याने बराच खर्च वाचेल, अशी








विधाने केली होती. त्याला त्रिं. गो. देशमुखांनी सडेतोड उत्तर दिले होते (त्रिं. गो. देशमुख २००७, (I), पृष्ठे ४७-५०). नागपूर कराराच्या वेळी मात्र बॅ. रामराव देशमुख संयुक्त महाराष्ट्रवादी बनले आणि त्यामुळे बापूजी अणे यांचा एक भक्कम आधार कमी झाला होता.

विदर्भाच्या सांस्कृतिक अस्मितेचा मुद्दा लो. बापूजी अणे यांनी जरी राज्य पुनर्रचना आयोगापुढे आग्रहाने मांडला, तरी महाविदर्भाच्या चळवळीतील दुसरे खंदे नेते ब्रिजलालजी बियाणी यांनी एका पुस्तिकावजा पत्रकात विदर्भाच्या आर्थिक परिस्थितीचा विस्तृत आढावा घेतला होता. त्यात विदर्भातील प्रमुख पिकांचे उत्पादन, विशेषत: ज्वारी, तांदूळ (ही अन्नधान्ये) आणि कापूस, भुईमूग, गळिताच्या (या व्यापारी) धान्यांचे उत्पादन लोकसंख्येच्या प्रमाणात उत्तर प्रदेश आणि पंजाब, पश्चिम बंगाल आणि ओरिसा राज्यातील उत्पादनाच्या तुलनेत विदर्भात कसे अधिक आहे, हे आकडेवारीसह सिद्ध केले होते. शिवाय वनसंपत्ती, पशुधन, उद्योगधंदे, ऊर्जा (विद्युतशक्ती), खनिज संपत्ती, वाहतूक (रस्ते इत्यादी) यांचा अधिक जलद गतीने विकास होण्याची पूर्ण शक्यता आहे आणि आर्थिकदृष्ट्या वेगळा महाविदर्भ प्रांत स्वयंपूर्ण होऊ शकेल, अशी भूमिका घेतली होती (बियाणी, १९५५, पृष्ठे १-१२). म्हणजे बियाणींना आर्थिक विकासाचे महत्त्व अधिक वाटत होते आणि एक स्वतंत्र राज्य म्हणून विदर्भ आर्थिकदृष्ट्या स्वयंपूर्ण होईल, असा विश्वासही वाटत होता.

फाजल अली आयोगानेसुद्धा स्वतंत्र विदर्भ राज्याची शिफारस करताना विदर्भ हा नेहमीच संपन्न व शिलकी उत्पन्नाचा प्रदेश होता, तेथील लोक आर्थिक सुस्थितीत असल्याने बृहन्मुंबई सोडल्यास उर्वरित महाराष्ट्राची आर्थिक तूट लक्षात घेता संयुक्त महाराष्ट्रात जाण्यास उत्सुक नाही. कारण विदर्भाच शिलकी उत्पन्न आणि साधनसंपत्ती विदर्भाच्या विकास योजनांवर व प्रकल्पांवर खर्च होईल, असा भरवसा विदर्भातील लोकांना वाटत नाही हे मान्य केले होते. म्हणून स्वतंत्र विदर्भ राज्य झाल्यास ते आर्थिकदृष्ट्या स्वयंपूर्ण व शिलकी उत्पन्नाचे राज्य होईल, असे मत त्या आयोगाने नोंदवले होते (जामकर, २०००, पृ. ८).

स्वतंत्र विदर्भ राज्याच्या मुद्द्यावर बियाणीजींची अविचल निष्ठा होती. भाषावार प्रांतरचनेसाठी फाझल अली आयोग नेमण्याच्या आधीपासून ते वऱ्हाडातले एक मान्यवर कॉंग्रेस नेते होते. घटना समितीसाठी झालेल्या १९४६च्या निवडणुकीत बियाणीजी घटना परिषदेवर निवडून गेले. तशी डॉ. पंजाबराव देशमुख यांचीच इच्छा होती. म्हणून विदर्भातून जे तीन सदस्य निवडले गेले, त्यांत ब्रिजलालजींची बिनविरोध निवड झाली होती. १९५२च्या पहिल्या सार्वत्रिक निवडणुकीनंतर ते मध्यप्रांत-वऱ्हाडचे अर्थमंत्री झाले. पं. जवाहरलाल नेहरूंच्या आग्रहामुळेच पं. रविशंकर शुक्ला यांच्या मंत्रिमंडळात त्यांचा २३ फेब्रुवारी १९५२ रोजी शपथविधी झाला. कॉंग्रेसमध्ये ते महात्मा गांधी यांचे समर्थक, तर बापूजी अणे टिळकानुयायी मानले जात; मात्र स्वतंत्र विदर्भ राज्य स्थापनेबाबत ते बापूजी अणे यांच्यासोबत अखेरपर्यंत लढले. १९५६मध्ये द्विभाषिकाच्या स्थापनेनंतर त्यांनी ५ फेब्रुवारी १९५६ रोजी वित्तमंत्री पदाचा राजीनामा दिला आणि १९५७ च्या निवडणुकीत विदर्भाच्या प्रश्नावर ते मंगरूळपीर विधानसभा मतदार संघातून मुंबई विधानसभेवर निवडून गेले (हराळे, १९९२, पृ. ३९-४१). महाविदर्भासाठीच्या आंदोलनात त्यांचे बहुमोल योगदान होते. २६ जानेवारी १९६०ला त्यांनी त्यासाठी विदर्भात पदयात्राही काढली होती (हराळे, पूर्वोल्लेखित, पृ. ७८, ९३-९९).

महाराष्ट्र राज्य स्थापनेच्या आधी वैदर्भीय नेत्यांची एकजूट होती. द्विभाषिक राज्य अस्तित्वात आले आणि नंतर मात्र त्यांच्यात फाटाफूट सुरू झाली. महाराष्ट्रात सामील झालात, तर नव्या, येऊ घातलेल्या संयुक्त महाराष्ट्राच्या सत्तारचनेत तुम्हाला मंत्रिपदे मिळू शकतील, असे आमिष पश्चिम महाराष्ट्रातल्या नेतृत्वाने विदर्भातील काही नेत्यांना दाखवले. द्विभाषिक राज्यात अशी रस्सीखेच सुरू असताना जातीय अस्मितेची आणि निष्ठांची समीकरणे मांडली गेली नसतीलच, असे काही खात्रीलायकपणे म्हणता येणार नाही. अन्यथा 'स्वतंत्र विदर्भाची चळवळ म्हणजे शेटजी-भटजींची चळवळ' अशी हीन दर्जाची नारेबाजी १९५७ सालच्या सार्वत्रिक निवडणुकांत मध्यप्रांत आणि मुंबई (द्विभाषिक) राज्यात झाली नसती. परिणाम असा झाला की, खोल पाण्यात गाळ टाकला गेला

आणि त्यात काही वैदर्भीय मासे अडकले! उदाहरणार्थ मुळात मा. स. कन्नमवार, आबासाहेब खेडकर (अकोला), वसंतराव नाईक (पुसद), त्यावेळचे कामगार नेते ॲड. वसंत साठे (नागपूर) – जे पुढे केंद्रात मंत्री झाले, मधुसूदन वैराळे (अकोला) ही सर्व विदर्भवादी नेते मंडळी होती. आबासाहेब खेडकर ब्रिजलाल बियाणींसोबत असत आणि वैराळे तर काही काळ बियाणीजींचे स्वीय सचिव म्हणून त्यांच्या सोबत वावरत असत. मध्यप्रांतात द्विभाषिक राज्य होण्यापूर्वी वसंतराव नाईक उपमंत्री होते, तसेच वाशिमचे डॉ. शंकरराव (दाजीसाहेब) कुळकर्णीही उपमंत्री (आरोग्य खाते) होते; पण राज्य पुनर्रचना आयोगाच्या शिफारशी पं.नेहरू आणि गोविंद वल्लभ पंतांनी जशाच्या तशा लागू केल्या नाहीत आणि द्विभाषिक मुंबई राज्य अस्तित्वात येताच ब्रिजलाल बियाणी व डॉ. कुळकर्णी यांनी मंत्रिमंडळाचा राजीनामा दिला. बियाणी तेव्हा मध्यप्रांताचे वित्त (अर्थ) मंत्री होते (हराळे, १९९२, पृ. ४८-७५). मात्र कन्नमवार, वसंतराव नाईकांनी यशवंतराव चव्हाणांचा विश्वास संपादन करत त्यांच्या मंत्रिमंडळात स्थान पटकावले. पुढे दोघेही राज्याचे मुख्यमंत्री झाले. हा इतिहास सर्वांनाच माहिती आहे; पण अणेंसोबत बियाणीजी, त्र्यं. गो. देशमुख वगैरे नेते स्वतंत्र विदर्भ राज्याच्या तत्त्वाशी आणि मागणीशी एकनिष्ठ राहिले. आबासाहेब खेडकर आणि मधुसूदन वैराळे दोघांनीही महाराष्ट्राच्या पारड्यात वजन टाकले. पुढे ते दोघेही मंत्रिपदावर आरूढ झाले.

याउलट बापूजी अणे यांचे वैदर्भीय राजकारण आत्मकेंद्री, आत्मलक्ष्यी कधीच नव्हते, तर ते मूल्याधिष्ठित होते. त्यांनी घेतलेल्या राजकीय भूमिकेमागे पदलालसा किंवा मोठेपणाचे आकर्षण होते, असा आरोप त्यांच्या शत्रूंनीही कधी केला नाही. त्यांचे सर्व राजकारण हे लोककारणाच्या प्रेरणेने प्रभावित झालेले होते. जसे बापूजी अणे यांचे राजकारण मूल्याधिष्ठित होते, तशीच त्यांची काँग्रेस पक्षावरील निष्ठाही वादातीत होती. उदाहरणार्थ १९५९ साली अनुसूयाबाई काळे यांच्या निधनामुळे नागपूर लोकसभेची जागा रिकामी झाली आणि त्यासाठी झालेल्या पोटनिवडणुकीत बापूजी अणेच काँग्रेसचे उमेदवार होते. बापूजी अणे यांची स्वतंत्र विदर्भ राज्याची मागणी तेव्हा जगजाहीर होती. त्यांच्या विरोधात संयुक्त महाराष्ट्र समितीने बॅ. खोब्रागडे यांना उभे केले. संयुक्त महाराष्ट्र समितीने प्रचाराच्या धुमाळीत नानासाहेब गोरे, एस. एम. जोशी, कॉ. डांगे आणि आचार्य अत्रे यांच्यासारखे दिग्गज उतरवले होते. त्यांनी घरोघर प्रचारही केला; मात्र त्या निवडणुकीत महाविदर्भाचे कट्टर पुरस्कर्ते अणे यांचाच विजय झाला. नंतर १९६२ मध्ये झालेल्या तिसऱ्या सार्वत्रिक निवडणुकीत बापूजी काँग्रेसच्या विरोधात उभे राहिले. याही वेळेस ते भक्कम मताधिक्क्याने विजयी झाले. आजच्या राजकारणाच्या परिभाषेत 'अणे यांनी काँग्रेस पक्षात बंडखोरी केली', असे म्हटले गेले असते; पण त्यांनी काँग्रेसपक्ष कधीच सोडला नाही. पक्षात राहूनच स्वतःची स्वतंत्र विदर्भ राज्याविषयीची मते ते निर्भीडपणे मांडत राहिले. १९६२च्या लोकसभा निवडणुकीत बापूजी अणे विदर्भ आंदोलन समितीचे उमेदवार होते, तर त्यांचे प्रतिस्पर्धी काँग्रेसचे उमेदवार रिखबचंद शर्मा होते. निवडणुकीत बापूजींनी शर्मा यांचा पराभव केला. या निवडणूक प्रचारासाठी भारताचे पंतप्रधान पं.नेहरू स्वतः आले होते; मात्र जाहीर प्रचार सभेत नेहरूंनी काँग्रेस उमेदवार शर्मांचा साधा उल्लेखही केला नाही. उलट पत्रकारांनी याबाबत नेहरूंना छेडले असता पक्षाच्या अधिकृत उमेदवाराबद्दल न बोलता 'बापूजी अणे काँग्रेस के खास आदमी है' अशा शब्दांत नेहरूजींनी आदरभाव व्यक्त केला (धनकर, २०१०, पृष्ठ ६५) आणि बंडखोरी जरी केली होती, तरीही अणे यांना काँग्रेसमधून काढून टाकण्याची हिंमत पं. नेहरूंना किंवा इतर काँग्रेसश्रेष्ठींना झाली नाही.

त्यानंतर १९६७च्या चौथ्या लोकसभेच्या निवडणुकीत बापूजी अणे पुन्हा उतरले आणि या वेळी मात्र काँग्रेस पक्षाचे अधिकृत उमेदवार नरेंद्र देवघरे यांनी बापूजींचा पराभव केला. अनेकांच्या मते, बापूंजींनी ही निवडणूक लढवायला नको होती. त्यावेळी त्यांचे वय ८७ होते. गंभीर आजारातून बाहेर आल्यानंतर त्यांनी दोन निवडणुका जिंकल्या होत्या आणि लोकसभेत त्यांनी आठ वर्षे काम केले होते. स्वतंत्र विदर्भ राज्याला व्यापक जनाधार आहे, हे त्यांनी एका नव्हे, तर दोन लोकसभा निवडणुकीत सिद्ध करून दाखवले होते. स्वतःऐवजी त्र्यं. गो. देशमुख










किंवा दुसऱ्या एखाद्या विदर्भवादी नेत्याला विदर्भ आंदोलन समिती किंवा महाविदर्भ संघर्ष समितीचा उमेदवार म्हणून निवडणुकीत उभे केले असते, तर अणे यांना पराभव पाहावा लागला नसता किंवा मतदारांनी वेगळा कौल दिला असता.

१९५० आणि १९६०च्या दशकात बापूजी अणे यांच्या-प्रमाणेच ब्रिजलाल बियाणी हे दुसरे प्रभावी विदर्भवादी नेते होते; मात्र कधी ते 'मारवाडी-व्यापाऱ्यांचे प्रतिनिधी' आहेत या शब्दांत, तर कधी महाविदर्भाचे प्रचंड देशभक्त आणि करोडपती बिर्लांचे वैदर्भीय राजकारणी व्याही आणि स्वतंत्र महाविदर्भाचे नित्याचे तुणतुणे वाजवणारे' या शब्दांत पश्चिम महाराष्ट्रातील बियाणीजींच्या विरोधकांनी त्यांच्यावर सातत्याने आगपाखड केली.[५] वास्तविक एक स्नेहशील व्यक्तिमत्त्व, उत्तम वक्ते, 'दै. मातृभूमी' (अकोला) चे संपादक आणि मध्यप्रांताच्या मंत्रिमंडळातील अर्थमंत्री म्हणून बियाणीजी विशेषतः तळागाळातल्या शेतकरी वर्गात, अत्यंत लोकप्रिय होते (देशमुख, १९९७ (I), पृष्ठे ६३-६७; धनकर, २०१०, पृष्ठ ६६); पण राज्य पुनर्रचना आयोगाची विदर्भ स्वतंत्र राज्य निर्मितीबाबत शिफारस डावलून केंद्र सरकारने प्रथम द्विभाषिक राज्य आणि नंतर १ मे १९६० मध्ये संयुक्त महाराष्ट्र (विदर्भा-सह) स्थापन करताच ब्रिजलाल बियाणी राजकारणातून निवृत्त झाले आणि जीवनाची संध्याकाळ त्यांनी इंदूर (म. प्र.) मध्ये विजनवासात घालवणे पसंत केले.

१९६०च्या दशकानंतर बापूजी अणे आणि ब्रिज-लालजी बियाणी दोघेही स्वतंत्र विदर्भाच्या पहिल्या पिढीचे नेते राजकीय रंगमंचावरून निघून गेले होते. नंतर 'ज्यांना द्वैभाषिक चालू शकते, त्यांना संयुक्त महाराष्ट्र का चालणार नाही?' अशा शब्दांत यशवंतरावजी चव्हाण यांनी लो. बापूजी अणे यांच्या द्विभाषिक स्वीकारण्यामागील रणनीतीची खिल्ली उडवत विदर्भासाठीची चळवळ मोडीत काढण्याचा पद्धतशीर प्रयत्न सुरू केला. विदर्भातील काँग्रेसच्या पुढाऱ्यांमध्ये (मुळात विदर्भवादी असूनही) स्वतंत्र विदर्भ राज्य की काँग्रेस पक्ष, असा पेच उभा राहिला असता, नव्या सत्तारचनेत मंत्रिपदावर डोळा ठेऊन काँग्रेसला मोठे मानून आपल्या पक्षनिष्ठेचे प्रदर्शन करण्याची जणू स्पर्धाच सुरू झाली. सुरुवात मारोतराव कन्नमवार किंवा वसंतराव नाईक यांच्यापासून झाली. त्यांच्यापाठोपाठ गोपाळराव खेडकर, मधुसूदन वैराळे, ॲड. वसंत साठे या सर्वांनीच 'सत्तेपुढे शहाणपण चालत नाही', या म्हणीचा पुन्हा प्रत्यय करून दिला.

विदर्भवादी नेतृत्वाच्या दुसऱ्या पिढीत त्रिं. गो. (टी. जी.) देशमुख आणि जांबुवंतराव धोटे यांचा प्रभाव काही काळ टिकला. टी. जी. देशमुख हे बापूजी अणे यांचे कट्टर अनुयायी. त्यांचा सभांतील आक्रमकपणा आणि प्रभावी वक्तृत्व अनेकांच्या स्मरणात राहील इतके परिणामकारक असे. स्वतंत्र विदर्भाची भूमिका त्यांनी 'मराठी जग' या त्यांच्या साप्ताहिकातून सातत्याने मांडली. स्वतंत्र विदर्भाच्या मागणीला विरोध करणाऱ्यांवर टी. जी. यांनी त्या साप्ताहिकातून त्यांच्या खास उपरोधिक आणि सडेतोड शैलीत टीकास्त्रे सोडली; मग ते धनंजय-राव गाडगीळ असोत, बॅ. शेषराव वानखेडे असोत की, बॅ. रामराव देशमुख असोत, टी. जी. यांनी कोणालाही सोडले नाही. विदर्भ आंदोलनात त्यांना पोलिसी खाक्याचा सामना करावा लागला आणि तुरुंगाची हवा खाण्याची सवयच त्यांना जडली होती; पण बापूजी अणे यांनी जसे काँग्रेसशी जुळवून घेण्याचे धोरण स्वीकारले होते (विशेषतः १९४० ते १९५४), त्याचप्रमाणे त्यांचाच आदर्श ठेऊन, पावलावर पाऊल टाकून टी. जी. देशमुखसुद्धा काँग्रेस पक्षास जाऊन मिळाले. एवढेच नाही, तर १९६६ ते १९७२ असे सहा वर्षे ते संसदेत राज्यसभा सदस्य झाले. १९७०च्या दशकात त्यांनी 'नाग विदर्भ आंदोलन समिती' स्थापन केली आणि स्वतंत्र विदर्भ राज्यवादी भूमिका थोडी फार कायम ठेवली. त्यांनी नागपूर महानगर-पालिकेच्या निवडणुका लढवल्या. एकदा ते महापौरही झाले. आणीबाणीनंतर झालेल्या काँग्रेस पक्षाच्या विभाजना-नंतर टी. जी. पुन्हा इंदिरा काँग्रेसच्या बाजूने विधानसभा निवडणुकीत १९८० मध्ये उमरखेड मतदारसंघातून आमदार म्हणून निवडून आले. काही काळ ते राज्यमंत्रीही होते. १९६२ आणि १९६७च्या निवडणुकांत विदर्भ आंदोलनाची वाटचाल यशस्वीरित्या सुरू होती. तेव्हा त्यांनी काही आमदार निवडून आणले, हे खरे; पण स्वतंत्र विदर्भ राज्यनिर्मितीसाठी लागणारा 'करो या मरो' असा निर्णायक लढा जसे बापूजी अणे उभा करू शकले नाही, तसा

अनुक्रमणिका

टी. जी आणि त्यांचे कार्यकर्तेही उभे करू शकले नाही. अर्थात, शेवटच्या क्षणापर्यंत ते स्वतंत्र विदर्भवादी राहिले एवढेच (धनकर, २०१०, पृष्ठ ६५); पण ते त्यांच्या आत्मिक समाधानासाठी!

विदर्भ राज्यवादी नेत्यांच्या मांदियाळीत उल्लेख केला पाहिजे, तो म्हणजे चंद्रपूर जिल्ह्यातील अहेरीचे प्रसिद्ध जमीनदार राजे विश्वेश्वरराव यांचा. त्या सुरक्षित मतदार संघातून ते १९५७ ते १९७७ अशी सलग २० वर्षे आमदार म्हणून आणि आणीबाणीनंतर १९७७च्या निवडणुकीत लोकसभेवर प्रचंड बहुमताने निवडून आले. अत्यंत सुसभ्य वागणूक आणि विश्वासार्हतेसाठी प्रसिद्ध असलेल्या राजे विश्वेश्वररावांना 'आंदोलनाचे राजकारण' जमले नाही. चळवळ उभी करणे, त्यासाठी कार्यकर्ते तयार करणे आणि चळवळीच दिशादर्शक नेतृत्व करणे त्यांना जमले नाही. तो त्यांचा पिंड नव्हता; पण हवेची लाट आली की, त्या दिशेने तोंड फिरवणाऱ्या (इमारतींवरील दिशादर्शक wind cock) कोंबड्यासारखी त्यांनी भूमिका आणि पक्षनिष्ठा बदलली नाही. ही जमेची बाजू असूनही राजे विश्वेश्वररावांचा म्हणावा तसा विदर्भ आंदोलनाला उपयोग झाला नाही.

टी. जी. देशमुख आणि विश्वेश्वररावांचे समकालीन तिसरे महाविदर्भ राज्यवादी आघाडीचे नेते म्हणजे जांबुवंतराव धोटे. सर्वार्थाने चळवळ तळागाळात नेण्याची क्षमता असलेल्या जांबुवंतरावांचे व्यक्तिमत्त्व साहसी होते. त्यांची भाषणे आवेशपूर्ण असत. 'सार्वजनिक जीवनात सहज विरघळून जाणारे नाट्य आणि आकर्षक मैदानी घोषणा देण्याची समयज्ञता यामुळे जांबुवंतरावांच्या नेतृत्वाने मूळ धरले' (धनकर, पूर्वोल्लेखित, पृष्ठ ६६). १९७१च्या बांगलादेश युद्धानंतर विजयी वातावरणात इंदिरा गांधींनी मध्यावधी निवडणूक घेतली. त्यात विदर्भातील ११ पैकी १० लोकसभेच्या जागा काँग्रेसने जिंकल्या; पण नागपूर लोकसभा मतदारसंघातून मात्र 'फॉरवर्ड ब्लॉक'चे उमेदवार म्हणून जांबुवंतराव धोटे रिखबचंद शर्मा (काँग्रेस) यांचा पराभव करून विजयी झाले. इतक्या लोकप्रियतेच्या शिखरावर ते होते; पण आणीबाणीनंतर इंदिरा गांधीविरोधी जनतापक्षाची लाट आली, त्यात मात्र जांबुवंतराव इंदिराजींना जाऊन मिळाले. 'विदर्भ राज्य संघर्ष समिती'च्या झेंड्याखाली त्यांनी पदयात्रा काढली. १९७७-८० काळात त्यांनी चक्क 'फॉरवर्ड ब्लॉक पक्षा'सह इंदिरा काँग्रेसमध्ये प्रवेश केला. १९८०मध्ये ते नागपूरहून लोकसभेवर निवडून गेले.[६] १९८४मध्ये मात्र जांबुवंतरावांनी काँग्रेसला सोडचिठ्ठी दिली. त्यानंतर त्यांच्या राजकीय प्रभावाला ओहोटी लागली. तो त्यांचा प्रभाव पुन्हा जनाधार निर्माण करू शकला नाही.

जुन्या पिढीतल्या विदर्भ नेत्यांमध्ये वसंत साठे हे पेशाने वकील, पण मुळात नागपूरमधील कामगार चळवळीत ते पुढे आले. राजभाऊ रुईकरांचे ते उत्तराधिकारी मानले जात; पण ते समाजवाद्यांना जवळचे, म्हणून प्रथम संयुक्त महाराष्ट्रवादी होते. १९८० पासून तर ते सतत अकोला किंवा वर्धा मतदार संघातून काँग्रेसचे उमेदवार म्हणून लोकसभेवर निवडून गेले. एकदा पराभूतही झाले. दिल्लीत जवळपास दोन दशके मंत्रिपदी असताना त्यांनी गांधी-नेहरू परिवारासोबत आपली निष्ठा जोपासण्यात धन्यता मानली; पण त्या दरम्यान साठे यांनी स्वतंत्र विदर्भ राज्याची आवश्यकता दिल्लीधीशांना पटवून देण्यासाठी आपली प्रतिष्ठा कधीच पणाला लावली नाही. तसा त्यांनी साधा प्रयत्नही केला नाही. काँग्रेस श्रेष्ठींची, विशेषतः त्यांनी गांधी-नेहरू परिवाराची मर्जी सांभाळून स्वतःचे सत्तापद अढळ करण्यात त्यांनी 'पुरुषार्थ' मानला. म्हणून त्यांनी अधूनमधून केलेल्या स्वतंत्र विदर्भाच्या समर्थनाला आणि वक्तव्यांना नैष्ठिक आधार कधीच नव्हता. त्यामुळे वसंत साठे यांच्या राजकारणातील दीर्घकाळ अनुभवाचा स्वतंत्र विदर्भ राज्य निर्मितीसाठी सुरू झालेल्या आंदोलनाला यत्किंचितही लाभ झाला नाही. कारण त्यांच्या विदर्भ राज्याबाबत प्रासंगिक वक्तव्यांना व्यापक जनाधार कधीच नव्हता.

या संदर्भात आणखी एका गोष्टीचा उल्लेख करणे आवश्यक आहे. १९७०-७१ पर्यंत टी. जी. देशमुख आणि त्यांच्या पाठोपाठ जांबुवंतराव धोटे दोघेही काँग्रेसवासी झाले होते, तरी अंतर्मनात ते विदर्भ राज्यवादी राहिले; मात्र त्यांच्या आंदोलनातील हवा निघून गेली होती आणि त्यांची आक्रमकता, मैदानी भाषणे इतिहासजमा झाली होती. जांबुवंतराव १९८०-८१ पर्यंत निवडणुकीच्या आखाड्यात दंड थोपटत राहिले; पण आधी विदर्भवादी, नंतर

फॉरवर्ड ब्लॉक, कधी जनता पक्षासोबत, तर कधी इंदिरा काँग्रेस पक्षासोबत (फॉरवर्ड ब्लॉकसहित) गेल्यामुळे धोटे यांना काही व्यक्तिगत लाभ खासदारकीच्या स्वरूपात मिळाले असले, तरीही त्यांच्या राजकारणातील मुक्त विहाराने त्यांची जनमानसातील विश्वासार्हता क्षीण झाली. त्याचा सर्वाधिक फटका स्वतंत्र विदर्भ राज्यासाठी सुरू असलेल्या चळवळीला आणि संघर्ष समितीला बसला. अशाही स्थितीत १९७० मधेच चळवळीचे एक उत्साही व अभ्यासू कार्यकर्ते आनंदराव कळमकर यांनी एक पुस्तिका लिहून प्रसिद्ध केली.[७] तीत महाविदर्भ हे स्वतंत्र राज्य झाल्यास/निर्माण केल्यास ते राज्य आर्थिकदृष्ट्या कसे स्वयंपूर्ण होईल, याबद्दल आकडेवारीसह तर्कशुद्ध मांडणी त्यांनी केली (कळमकर, १९७०,पृष्ठे ८-४८).

याच सुमारास 'महाविदर्भ राज्य संघर्ष समिती'चे समन्वयक बाळकृष्ण वासनिक (१९७०, पृष्ठे १-५) यांनी भारताचे राष्ट्रपती आणि पंतप्रधानांकडे समितीच्या वतीने एक निवेदन पाठवले. त्यात महाविदर्भ हे स्वतंत्र राज्य निर्माण केले जावे, असे आवाहन केले होते. बापूजी अणे यांच्या कैफियतीमधील विदर्भाची स्वतंत्र सांस्कृतिक अस्मिता आणि ऐतिहासिक अनुभवांच्या वेगळे-पणाचा मुद्दा अधोरेखित करून वासनिकांनी महाविदर्भा-साठीची मागणी संयुक्त महाराष्ट्राच्या मागणी व आंदो-लनाच्या किती तरी आधीची आहे, यावर भर दिला आहे. इथे महत्त्वाचा मुद्दा हा आहे की, १९७० ते १९८४-८५ दरम्यान कोणत्या ना कोणत्या स्वरूपात स्वतंत्र विदर्भ राज्यासाठी आंदोलन सुरू राहिले. कधी विदर्भ बंद, कधी जांबुवंतरावांची पदयात्रा, कधी राष्ट्रपती/पंतप्रधानांना निवेदने, तर कधी निवडणुकांमध्ये नागविदर्भ आंदोलन समितीतर्फे, तर कधी महाविदर्भ राज्य संघर्ष समितीतर्फे उमेदवार उभे करून चळवळीचे अस्तित्व व काही प्रमाणात प्रभाव जाणवत राहिला.[८] येथपर्यंत विदर्भवादी नव्या नेतृत्वाची पिढी बापूजी अणे, ब्रिजलालजी बियाणींचा वैचारिक वारसा मानत होती. तरीही चळवळीचे नवे नेतृत्व विदर्भाच्या सांस्कृतिक वेगळेपणाची, अस्मितेची भाषा अपवादानेच वापरू लागले होते. नेतृत्वाच्या नव्या पिढीचा भर आर्थिक विकासांवर अधिक होता आणि जनतेच्या आशा-आकांक्षा पूर्ण करण्यासाठी विकासाची उद्दिष्टे साध्य करायची असतील, तर त्यासाठी स्वतंत्र राज्य व त्याची स्वायत्तता, विकासाचे अग्रक्रम आणि धोरणे ठरवण्याचे स्वातंत्र्य वैदर्भीयांना असले पाहिजे, हे महाविदर्भवादी आंदोलनाच्या मागणीमागचे प्रमुख सूत्र होते.

**विदर्भवाद्यांच्या रणनीतीतील चुका**

१. 'अकोला कराराप्रमाणे जर महाराष्ट्र आणि विदर्भ हे दोन उपप्रांत मिळून (म्हणजे त्यांना स्वतंत्र उपप्रांताचा दर्जा मिळून) जर संयुक्त महाराष्ट्र झाला नाही, तर विदर्भ हा महाराष्ट्राबरोबर जायला तयार होईल', ह्या बॅ. रामराव देशमुखांच्या भूमिकेमुळे, कट्टर विदर्भवादी समजले जाणारे बापूजी अणे, बियाणीजी, त्रिं. गो. देशमुख प्रभृती नेते मंडळी गाफील राहिली. राज्यघटनेत उपप्रांत ही संकल्पनाच मोडीत निघाल्यामुळे बॅ. रामरावांना संयुक्त महाराष्ट्रवादी होण्यात कोणताच संकोच वाटला नाही;[९] मात्र त्यामुळे चळवळीमध्ये जातीय ध्रुवीकरण होऊन मराठा आणि विदर्भातील बहुजन ब्राह्मणे-तरांच्या नेत्यांनी काँग्रेसशी (विदर्भ राज्यापेक्षा) एकनिष्ठ राहणे पसंत केले आणि विदर्भ आंदोलनाची कास सोडली.

२. एक तत्त्व म्हणून भाषावार प्रांतरचना म्हणून जरी स्वीकारली, तरी त्याचा अर्थ एका भाषेचे एक राज्य असा होत नाही. मराठी भाषिकांची दोन राज्ये झाली, तरी त्या तत्त्वाचे उल्लंघन होत नाही किंवा मराठी भाषिकांच्या ऐक्याला बाधा निर्माण होत नाही, हा विचार अगदी १९५३ पासून म्हणजे राज्य पुनर्रचना आयोग स्थापन होण्याच्या आधीपासून विदर्भ आंदोलनात अधिक ठळकपणे मांडायला हवा होता. आपण महाराष्ट्र विरोधी नाही, तर दोघांनी (संयुक्त महाराष्ट्रवाद्यांनी आणि विदर्भ-वाद्यांनी) मिळून दोन मराठी भाषिक प्रांतांसाठी संयुक्त लढा देऊ, असा प्रचार करणे अधिक हितावह झाले असते. निदान त्या रणीनीतीमुळे गैरसमज कमी झाले असते आणि विदर्भाची दिशाभूल टळली असती.

३. १९५३ सालीच वेगळ्या विदर्भ राज्याचा पुरस्कार करण्यासाठी 'नाग विदर्भ आंदोलन समिती' टी. जी. देशमुखांच्या नेतृत्वाखाली स्थापन झाली. टी. जी. हे समितीचे पहिल्यापासून सरचिटणीस म्हणून काम करत होते. मात्र आक्रमक प्रचार करताना त्यांच्याकडून अनेकदा

तारतम्याचे भान सुटले. सर्व मराठी भाषिकांचे एकच संयुक्त महाराष्ट्र राज्य असावे, असे म्हणणाऱ्यांना 'साम्राज्यवादी' म्हणणे आणि हे महाविदर्भ गिळंकृत करण्याचा त्यांचा डाव आहे, अशी अतिरंजित टीका टी. जीं. नी केली. त्याचा एक परिणाम असा झाला की, आर्थिकदृष्ट्या आठ जिल्ह्यांचा महाविदर्भ अधिक स्वयंपूर्ण आणि इतर बऱ्याच राज्यांपेक्षा अधिक सक्षम झाला असता, या वस्तुस्थितीची दखल न घेता धनंजयराव गाडगीळांसारख्या विद्वान अर्थशास्त्रज्ञाने 'महाविदर्भाची कल्पनाच कृत्रिम आहे', अशी शेरेबाजी करण्याची दुसऱ्या बाजूच्या प्रचारात अतिरंजिकता केली गेली (वैद्य, २००७, पृष्ठे १६-१७).

४. सर्वच विदर्भवादी नेत्यांनी मराठी भाषिकांमध्ये असणाऱ्या जातीय उतरंडीची, अस्मितांची आणि जातीय ध्रुवीकरणाच्या संभाव्य धोक्याची समीकरणे मांडली नाही, त्याचे विश्लेषण केले नाही. १९३१मध्ये सर्वपक्षीय परिषदेने अणे अहवाल (विदर्भ-वऱ्हाडबाबत) तयार करवून घेतला, तेव्हापासून तर १९६०-६१ पर्यंत म्हणजे संयुक्त महाराष्ट्र स्थापनेपर्यंत अपवाद वगळता, स्वतंत्र विदर्भ राज्यवादी नेतृत्व उच्चवर्णीयांकडे होते. सर्वपक्षीय समित्यांमध्ये ब्राह्मणेतर म्हणजे मराठा, दलित, मुस्लीम इत्यादी सदस्य असायचे; पण भाषावार राज्य पुनर्रचनेचा विचार करताना वास्तविक कोणा नेत्याची जात काढण्याचे कारण नव्हते; पण तत्त्व आणि जातीय व सामाजिक अभिसरण प्रक्रियेचे वास्तव यांची सांगड घातली जाऊ शकते, याचे अनुमान वैदर्भीय नेतृत्वाने केले नाही. अन्यथा बहुजन समाजाच्या शेतकरी संघटनेचे पंढरीनाथ पाटील यांच्यापासून तर डॉ. पंजाबराव देशमुखांपर्यंत ब्राह्मणेतर नेत्यांना बापूजी अणे, बॅ. रामराव देशमुख, खापर्डे, मुंजे इत्यादी वैदर्भीय नेत्यांनी स्वतंत्र विदर्भ राज्यवादी मुख्य प्रवाहापासून दूर होऊ दिलेच नसते.

५. फाझल अली आयोगाने विदर्भाचे वेगळे राज्य निर्माण करण्याची शिफारस केली असताना खरे तर विदर्भवाद्यांची बाजू अधिक बळकट झाली होती. त्यामुळे द्वैभाषिक राज्य निर्मितीनंतर संयुक्त महाराष्ट्रवाद्यांनी जसे 'मुंबई महाराष्ट्राला मिळाली पाहिजे' हा मुद्दा पुढे करून प्रखर आंदोलन केले, तसे त्याच वेळी म्हणजे १९५६-५७ मध्येच विदर्भवाद्यांनी तीव्र आंदोलन केले नाही. प्राणाची बाजी लावायला कोणी तयार झाले नाही. उलट द्वैभाषिकात गुजराती समाजाचे आर्थिक वर्चस्व राहील, या सबबीवर किंवा त्या भीतीपोटी विदर्भाच्या आठ जिल्ह्यांनासुद्धा द्विभाषिकात जोडले गेले (वैद्य, २००७, पूर्वोल्लेखित, पृष्ठ १७). एक प्रयोग म्हणून द्विभाषिकाला अणे यांनी विरोध केला नाही, हे खरे; मात्र तसे करताना काही कालावधीनंतर जसे गुजरात स्वतंत्र राज्य झाले, तसे महाविदर्भ हे सुद्धा वेगळे राज्य होईल आणि त्याकामी पश्चिम महाराष्ट्रातील नेते वैदर्भीयांना मदत करतील, अशी अट अकोला करारात आणि नंतर नागपूर करारात घालणे आवश्यक होते; पण तसे घडेल या भाबड्या आशेपोटी विदर्भवादी गप्प राहिले. त्याचा फायदा पश्चिम महाराष्ट्रातील धोरणी राजकारण्यांना झाला. स्वतंत्र विदर्भाच्या चळवळीतील एका एका नेत्याला मंत्रिमंडळात पद देऊन ते आंदोलनच मोडीत काढण्यात त्यांना यश मिळाले. 'ज्यांना द्वैभाषिक राज्य चालू शकते, त्यांना संयुक्त महाराष्ट्र का चालणार नाही?' अशा चतुर तर्कयुक्त प्रश्नांनी विदर्भवाद्यांच्या आशावादी, पण भोळसट धोरणाचे पश्चिम महाराष्ट्रातील नेत्यांनी हसे केले.

६. तेलंगणात जसे तीव्र आंदोलन झाले, तसे विदर्भात झाले नाही, ही वस्तुस्थिती आहे. बापूजी अणे यांनी जंगल सत्याग्रह केला आणि ब्रिटिश सरकारच्या विरोधात ते गांधीजींनी पुकारलेल्या सविनय कायदेभंगाच्या आंदोलनात उतरले खरे; पण त्यांचा पिंड आंदोलकाचा कधीच नव्हता. त्यांची धारणा प्रतिसहकारितावादी धोरणामुळे सदैव तडजोडीचे राजकारण करण्याकडेच झुकलेली असे. अन्यथा १९४२च्या 'चले जाव' आंदोलनाच्या वेळी ते व्हॉईसरॉयच्या 'एक्झिक्युटिव्ह कौन्सिल'मध्ये मंत्रिपदी राहिले नसते. त्यांची भूमिका स्वच्छ आणि तत्त्वनिष्ठ होती; तरीही पदाचे, सत्तेचे आमिष दाखवून या मंडळींना आंदोलनापासून प्रवृत्त करता येते, अशी वैदर्भीय नेतृत्वाची प्रतिमा तयार करण्यात नकळत बापूजी अणे यांनीच मोठे योगदान दिले. तोच वैचारिक वारसा टी. जी. देशमुखांनी लगेचच आत्मसात केला. अन्यथा १९६६-१९७२ या सहा वर्षांत टी. जीं. नी काँग्रेसची उमेदवारी








घेऊन राज्यसभेत जाणे पसंत केले नसते. नंतर टी. जीं.ना नागपूर लोकसभा मतदारसंघात काँग्रेसची उमेदवारी देऊ केली; पण ती काय नाग विदर्भ आंदोलन समितीच्या आंदोलनाची किंमत होती?[१०] इतकेही करून ते नागपूर लोकसभा मतदार संघाचे तिकीट अखेर टी. जीं. ना मिळाले नाहीच.

७. एक चंद्रपूरचे राजे विश्वेश्वरराव यांचा अपवाद वगळता जवळजवळ सर्वच नाग-विदर्भ, महाविदर्भ आंदोलनाच्या नेत्यांनी तडजोडीसाठी सतत भूमिका बदलली. नव्या सत्तारचनेत पदप्राप्तीसाठी स्वतःची राजकीय विश्वासार्हतासुद्धा पणाला लावली. त्याला जांबुवंतराव धोटेही अपवाद होऊ शकले नाही. बापूजी अणे यांनी वैचारिक अधिष्ठान दिलेल्या स्वतंत्र विदर्भ राज्यासाठीच्या चळवळीची ही खरी शोकांतिका आहे.

**विदर्भ : विकासाचे स्वप्न, मागासलेपणाचे वास्तव**

महाराष्ट्र राज्य निर्मिती होऊन आता अर्धशतक उलटले आहे. राज्यस्थापनेचे सुवर्णमहोत्सवी वर्ष अनेक सभा-समारंभ, सत्कार सोहळे, चर्चासत्रे, ग्रंथ प्रकाशन आणि नवे संकल्प यांनी साजरे केले गेले; पण विदर्भाची अवस्था आज काय आहे? अमरावती जिल्ह्यातील मेळघाट भागातच नव्हे, तर नागपूरसारख्या उपराजधानीचा दर्जा असलेल्या शहरात आणि जिल्ह्यातही ३२ टक्के बालके कुपोषित आहेत; बालमृत्यू दरसुद्धा (० ते ५) १७ टक्क्यांवरून ३९ टक्क्यांपर्यंत वाढला आहे. एकात्मिक बालविकास प्रकल्पांतर्गत अहवालात विदर्भ नागपूरच्या दुर्गम भागात पोषक आहार पुरवण्यासाठी आदेश दिले जावेत, अशी मागणी केली जाते. आदेश होतात, मात्र पोषक आहार योजनेचा लाभ गरजू बालकांपर्यंत पोहोचत नाही. परिणामतः शहरातील २० ते २४ टक्के बालकांचे वजन सरासरीपेक्षा अडीच किलो कमी असून सर्वेक्षणानंतर ३२ टक्के बालके कुपोषित असल्याचे आढळले ('दै. सकाळ', पुणे, ३ ऑगस्ट २०१०, पृष्ठ २). डॉ. अभय बंग यांच्या समितीने अभ्यास करून अहवाल दिला, तेव्हा कुपोषण मेळघाटसारख्या दुर्गम भागांपुरते मर्यादित आहे, असे वाटले होते. आता ती सर्व विदर्भाचीच समस्या झाली आहे.

विदर्भातील रखडलेल्या लघु व मध्यम सिंचन पाटबंधारे योजनांबद्दल विधानपरिषदेचे ज्येष्ठ सदस्य प्रा. बी. टी. देशमुख 'ऊर्ध्वबाहुविरोम्येश...' प्रमाणे मा. राज्यपालांपासून तर विधिमंडळापर्यंत आणि वैधानिक विकास महामंडळापर्यंत आवाज उठवत आले आहेत; मात्र विदर्भातील जवळपास १५० हून अधिक सिंचन योजना निधीअभावी अपूर्णावस्थेत वर्षानुवर्षे पडून आहेत. शेतकरी दोन-तीन पिके वर्षाकाठी घेऊ इच्छितात, तर त्यांना सिंचन योजनेतून पाणी मिळणे तर सोडा, बारमाही पिण्याच्या पाण्याचीही सोय नाही. अकोलासारख्या एका महत्त्वाच्या शहरात आठ दिवसांतून एकदा पाणीपुरवठा होतो आणि ही विदर्भातल्या अनेक शहरांमध्ये अवस्था आहे. विदर्भाच्या सिंचन योजनेतील अनुशेषासाठी शेकडो कोटी रुपयांची अंदाजपत्रकी तरतूद केली जाते; मात्र ही तरतूद वापरली जाऊ दिली जाणार नाही, याची काळजी घेणारे झारीतले शुक्राचार्य मुंबईतील मंत्रालयात बसलेले असतात! फेब्रुवारी महिना आला की, मग आता काही मंजूर केलेल्या रकमा विदर्भातील सिंचन प्रकल्पासाठी खर्च होणे शक्य नाही, अशी सबब सांगून ती तरतूद कृष्णा खोरे प्रकल्पासाठी वापरली जाते. असे किती वेळा झाले आहे, याचा शोध घेऊन आजचे विदर्भातील लोकप्रतिनिधी अभ्यास करून विधिमंडळात आवाज उठवीत नाहीत, हे कशाचे लक्षण मानायाचे?

तीच गोष्ट वीजपुरवठा-उत्पादन व ऊर्जा प्रकल्पांची. यावरील बरीच आकडेवारी असे दर्शवते की, विदर्भात पर्याप्त प्रमाणात वीजनिर्मिती होते; मात्र याबाबतीत विदर्भ स्वयंपूर्ण असूनही सदासर्वकाळ विदर्भातील शहरांमधून ६ ते ९ तास आणि ग्रामीण भागात तर १० ते १४ तासांपर्यंत दररोज विजेचे भारनियमन (लोडशेडिंग) केले जाते. त्याचा सर्वाधिक फटका शेतकरी वर्गाला बसतो. जिथे उपसासिंचन योजनांचा लाभ मिळतोय, तिथे नियमित विद्युत पुरवठा नसल्याने त्या लाभापासून शेतकरी वंचितच राहतात. नगदी पिके घेऊन आर्थिक दर्जा उंचवण्याचा प्रयत्न करणाऱ्या शेतकऱ्यांना कधी पाणी नाही, तर कधी वीज नाही; ते दोन्ही असले, तर दर्जेदार बियाणे व रासायनिक खते नाहीत, अशा दुष्टचक्राकामध्ये अडकल्याखेरीज पर्याय उरत नाही.

शेतमालाला हमी भाव मिळेलच, याची शाश्वती

नाही. अन्नधान्य आणि कापूस, भुईमूग, ऊस या नगदी (व्यापारी) पिकांच्या किमतीमध्ये किंवा आयात निर्यातीबाबत निश्चित धोरण नाही, धोरणात्मक सातत्य नाही. धर-सोडीचेच धोरण अवलंबले जाते. कापूस एकाधिकार योजनेमध्ये शासन कापूस विकत घेण्याची हमी देते, हे खरे; पण मार्केटयार्डात कापूस विकल्यानंतर एकदम मूल्य शेतकऱ्यांच्या हाती कधीच पडत नाही. उलट तीन-चार हप्त्यांमध्ये कधी कधी दीड-दोन वर्षांत विकलेल्या कापसाचे पैसे शेतकऱ्यांना मिळतात. या प्रकाराने कर्जबारी-पणाच्या विळख्यात सर्वच श्रीमंत-गरीब शेतकरी कमी-अधिक प्रमाणात गुरफटले गेलेत. महाराष्ट्रातील विशेषतः विदर्भातील शेतकऱ्यांनी हजारोच्या संख्येने २००१-१० या दशकात आत्महत्या केलेल्या आहेत. महाराष्ट्रात देशात इतरत्र कोणत्याही राज्यात नाहीत, इतकी म्हणजे चार कृषी विद्यापीठे आहेत. त्यातील संशोधनाचा लाभ अधिकतर सिंचन योजनेखाली आलेल्या शेतजमिनीच्या धारकांना मिळतो. महाराष्ट्रात जवळपास ८० टक्के शेतजमीन कोरडवाहू आहे. अशा शेतकऱ्यांना राज्यातील कृषी विद्यापीठांच्या संशोधनाचा लाभ क्वचितच मिळतो.

आत्महत्याग्रस्त शेतकरी कुटुंबांना आर्थिक मदत देण्यासाठी आणि सिंचन योजना पूर्ण करण्यासाठी केंद्र शासनाकडून २२०० कोटी रुपयांचे साहाय्य महाराष्ट्र राज्याला (पॅकेज) मिळाले; पण अशा कल्याणकारी आर्थिक तरतुदी लाभार्थीपर्यंत पोहोचत नाही. त्यामुळे किती आत्महत्याग्रस्त शेतकरी कुटुंबांना प्रत्यक्ष अर्थसाहाय्य दिले गेले किंवा किती सिंचन पाटबंधारे योजना पूर्ण केल्या जातात, याची चौकशी करण्याची वेळ आलेली आहे. वैदर्भीय आमदार-खासदारांना या प्रश्नांचा अभ्यास करून ते विधिमंडळात (गोंधळ न घालता) तर्कशुद्ध पद्धतीने मांडावे, असे कळकळीने वाटत नाही. तसे त्यांचे राजकीय शिक्षण होणे आवश्यक आहे, याची गरज राजकीय पक्षांच्या श्रेष्ठींना वाटत नाही.

विदर्भातील बिगर कृषी उद्योगधंद्यांची अक्षरशः पर-वडच झालेली आहे. एलिचपूरची विदर्भ मिल, अकोल्याची सावतराम मिल, बडनेरा-पुलगावच्या मिल्स आणि मुख्य म्हणजे नागपूरची एकेकाळची आघाडीची एम्प्रेस मिल ह्या एक तर बंद झाल्यात किंवा त्यांना अखेरची घरघर लागलेली आहे. बऱ्याच ठिकाणी 'महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळा'ने (M.I.D.C.) इंडस्ट्रिअल इस्टेट्स सुरू केल्या आहेत. त्यातील अपवाद वगळता बऱ्याच प्रकल्पांची अवस्था 'खर्चा एक रुपया और आमदानी चार आना' अशी आहे. पश्चिम विदर्भा (वऱ्हाड)च्या जिल्ह्यातील जुने हातमाग - यंत्रमागाचे उद्योग बंद पडू लागलेत. विदर्भात सहकारी साखर कारखाने काढण्याचाही प्रयोग झाला नाही, असे नाही; पण एक-दोन कारखान्यांचा अपवाद वगळता बहुतेक कारखाने आजारी कारखान्यांच्या यादीतच आढळतात!

**अपयशाचे खापर इतरांवर**

प्रादेशिक असमतोलाचा अभ्यास करण्यासाठी वि. म. दांडेकर यांच्या अध्यक्षतेखाली समिती १९८०च्या दशकात वसंतदादा पाटील मुख्यमंत्री असताना नेमली होती; मात्र या समितीने असमतोल मोजण्याची जी अभ्यास-पद्धती निवडली, त्यात विकासाचा निर्देशांक ठरवण्यासाठी 'तालुका' हे युनिट घेतले आणि त्यावरून त्यांनी जो निष्कर्ष काढला, तो म्हणजे विकासाचा अनुशेष जसा विदर्भ-मराठवाड्यातील जिल्ह्यांमध्ये आहे, तसाच तो पश्चिम महाराष्ट्रातही आहे. आश्चर्य म्हणजे दांडेकर समितीच्या एका आकडेवारीनुसार मराठवाड्याचा अनुशेष २३.५६ टक्के आहे, तर उर्वरित पश्चिम महाराष्ट्राचा अनुशेष ३७.३२ टक्के (एकूण अनुशेषाच्या कोटीमध्ये आहे) (आंबेडकर, २०१०, पृ. ६). म्हणजे कृष्णा नदीच्या पाण्यामुळे पश्चिम सांगली जिल्ह्यातील तालुके समृद्ध झाले, तरी जत, कवठे महांकाळसारखे पर्जन्यछायेतील तालुके विकासापासून वंचित राहिलेत. तेव्हा विकासाचा अनुशेष तालुकावार काढला जावा. ह्या अभ्यासपद्धतीमुळे समितीसमोर असलेल्या प्रादेशिक असमतोलाच्या विषया-तील 'प्रदेश' या संकल्पनेला पूर्णतः हरताळ फासला गेला. त्यामुळे दांडेकर समितीच्या अहवालाबाबत समितीचे एक सदस्य प्रा. बोरकर (औरंगाबाद) यांनी विरोधी मत नोंदवले होते; पण एकंदरच समितीचा अहवाल पश्चिम महाराष्ट्रातील धोरणी राजकीय नेतृत्वाला सुखावणाराच होता.

विदर्भ प्रदेशाचा पश्चिम व उर्वरित महाराष्ट्राबरोबरच समतोल विकास व्हावा आणि तो होईल, असा विश्वास

निर्माण करण्याचा प्रयत्न नागपूर कराराद्वारे झाला. त्याप्रमाणे नागपूर शहराला उपराजधानीचा दर्जा दिला गेला. वर्षातून एक हिवाळी अधिवेशन (राज्य विधिमंडळाचे) नागपूरला भरवण्याचे ठरले. ते मात्र आन्हिक कर्मकांड उरकल्यासारखे पूर्ण केले जाते. तेवढ्यापुरते मंत्री आणि नोकरशहा नागपुरात वास्तव्याला येतात; मात्र त्या मुक्कामाकडे ते बहुतेक शासकीय खर्चाने मौजमजा करण्यासाठीचा तो 'पेड हॉली'डे आहे, असेच पाहतात. विदर्भ भागातील प्रश्नांवर वेगवेगळे विरोधी पक्ष विधानसभा भवनावर मोर्चे आणतात. त्यांची तेवढ्यासाठी मुंबईला जाण्याची तसदी टळते, याचेच त्यांना समाधान वाटते! एक ते गोवारींना अनुसूचित जमातीमध्ये समाविष्ट करण्यासाठी झालेल्या भव्य मोर्चावर गोळीबार होऊन जे हत्याकांड (शासन पुरस्कृत) झाले, ते वगळल्यास राज्यशासन अशा विरोधकांच्या मोर्च्यांकडे फारसे गांभीर्याने पाहत नाही. विरोधकांचे नेतेदेखील पुढे त्या त्या प्रश्नांचा विशेष पाठपुरावा करताना दिसत नाही. विरोधकांचे मोर्चे, सभात्याग, धरणे, घोषणांचे सत्र ओसरले म्हणजे मग सत्ताधारी पक्ष विधिमंडळाच्या शेवटच्या दोन-तीन दिवसांत चर्चेविना/आवाजी मतदानाने दहा-बारा विधेयके घाईघाईने संमत करून घेतो. नागपूर अधिवेशनाची नेमकी फलश्रुती काय? या पत्रकारांच्या प्रश्नाला उत्तर देण्यापुरते, विधिमंडळाचे कामकाज झाले, हे दाखवण्यापुरतेच त्या विधेयकांचे महत्त्व! अन्यथा विधेयके संमत होऊन त्यांचे कायद्यात रुपांतर झाल्यावर त्यांच्या अंमलबजावणीबाबत जितके सत्ताधारी पक्ष आणि नोकरशहा उदासीन असतात, तितकेच विरोधकही असतात!

नागपूर करार आणि भारताच्या राज्यघटनेतील तरतुदीमुळे प्रादेशिक वैधानिक विकास महामंडळे अस्तित्वात आली आहेत. त्यात विदर्भ, मराठवाडा आणि कोकणसह उर्वरित महाराष्ट्रासाठी वैधानिक महामंडळे सध्या अस्तित्वात आहेत; मात्र त्या त्या महामंडळाच्या विकास योजनांच्या बादलीत पाणी किती सोडायचे (म्हणजे त्यांना निधी किती उपलब्ध करून द्यायचा), ते त्या नळाच्या तोटीवर असलेल्या पश्चिम महाराष्ट्रातील नेत्यांचा हातच ठरवतो! विकासाचा असमतोल दूर व्हावा आणि अनुशेष दूर करण्यासाठी निधी उपलब्ध व्हावा, यासाठी विदर्भातील मंत्री, आमदार, खासदार यापैकी कोणी गेल्या ५० वर्षांत उपोषणाला बसले नाही किंवा एक समयावच्छेद करून, ज्याप्रमाणे स्वतंत्र तेलंगणा राज्यनिर्मितीसाठी जसे त्यांच्या संघर्ष समितीने सर्वांना राजीनामे द्यायला लावले, तसे विदर्भाच्या नेत्यांनी कधी राजीनामे दिल्याचे ऐकिवात नाही. पश्चिम महाराष्ट्रातील मंत्रीमंडळी क्वचितच विदर्भाचा दौरा करतात. विदर्भातील मंत्री आणि आमदार मुंबईत आले (म्हणजे निवडणूक जिंकून) म्हणजे प्रथम आपली वरळी सी-फ्रंट (समुद्रकिनाऱ्यालगत) सदनिका (Flat) कशी तयार होईल, या गोष्टीला जास्त प्राधान्य देतात.

आणि तरीही आजचे वैदर्भीय नेते विदर्भाच्या मागासलेपणाचे खापर पश्चिम महाराष्ट्रातल्या नेतृत्वाच्या माथ्यावर फोडत असतात. अर्थात, हे केवळ जाहीर वक्तव्य करण्यापुरतेच. एरव्ही त्याच प. महाराष्ट्रातील मंत्री आणि नेत्यांची मर्जी संपादून आपला स्वत:चा 'कार्यभाग' साधून घेण्याच्या सतत प्रयत्नात ते असतात. अशा परिस्थितीत विकासाच्या अनुशेषासाठी पश्चिम महाराष्ट्राच्या नावाने खडे फोडणे कितपत समर्थनीय आहे? दक्षिण व पश्चिम महाराष्ट्रातील नेत्यांनी- मग ते यशवंतराव चव्हाण, किसन वीर, वसंतदादा पाटील, तात्यासाहेब कोरे, सखारामबापू पाटील असोत किंवा वाळव्याचे नागनाथअण्णा नायकवडी, प्रवराचे विखे पाटील, अकलूजचे मोहिते-पाटील किंवा कोपरगावचे शंकरराव कोल्हे असोत, ह्या सर्वांनी स्वकष्टाने, खेडोपाडी पायी चिखल तुडवीत शेतकऱ्यांना संघटित करून सहकाराची चळवळ उभी केली आणि सहकारी साखर उद्योग विकसित करून समृद्धी आणली. सिंचन योजना राबवल्या, धरणे बांधली, पाटबंधारे प्रकल्प पूर्ण केले. त्यामुळे ऊस उत्पादन मोठ्या प्रमाणावर घेणे शक्य झाले आहे. असे नेतृत्व विदर्भात उभे राहिलेले दिसत नाही. साखर उद्योगातून निघालेल्या मळीतून मद्यनिर्मिती, उसाच्या चिपाडापासून कागद, गूळ असे मोठ्या प्रमाणावर उत्पादन सुरू झाले. एवढेच नाही, तर त्यातील अनेक सहकारी साखर उद्योगांनी त्यांचे त्यांचे सुपरबाजार सहकारी तत्त्वावर सुरू केलेत. त्यांची दक्षिण महाराष्ट्रात संख्या ८०च्या जवळपास असून प्रत्येकाची उलाढाल कोट्यवधी रुपयांची होताना दिसते; मात्र विदर्भात

हे दृश्य दुर्मीळ आहे. हा विकास झाल्यानंतर मग साखर-सम्राटांचे शिक्षण-सम्राट झाले. त्यांनी त्यांची विनाअनुदानित इंजिनिअरिंग, मेडिकल कॉलेजेस काढलीत. आज त्या सहकार क्षेत्राला मरगळ आली, हे खरे; पण त्याला ऊर्जितावस्था यावी म्हणून अकराशे आणि अठराशे कोटी रुपयांचे पॅकेज केंद्रातून घेऊन येणारेही नेतृत्व पश्चिम महाराष्ट्रातलेच आहे, हे विसरता कामा नये.

वैदर्भीय नेत्यांच्या २१व्या शतकातल्या आजच्या पिढीला कष्ट नकोत, आंदोलने नकोत, त्याग विशेषतः पदाचा त्याग तर मुळीच नको, संघटना बांधण्याची दगदग नको. त्यातील बरेच नेते अर्ध्या हळकुंडाने पिवळे झालेले. एखादे मंत्रिपद मिळाले की, त्यांच्या वागण्या-बोलण्यात मदांधपणा दिसू लागतो. सध्याच्या विदर्भातील नव्या नेतृत्वाला झटपट पद हवे. ते मिळाले की, विदर्भ विकासाचा त्यांना विसर पडतो. एकदा मुंबईत पोहचले म्हणजे त्यांना गडचिरोलीत जाणे नको वाटते! विदर्भातील एकही मंत्री त्या जिल्ह्याचा पालकमंत्री व्हायला तयार नाही. ते पालकमंत्री पद आर. आर. (आबा) पाटील (तत्कालीन गृहमंत्री, मूळ सांगलीचे) यांना सांभाळावे लागते. हे कशाचे द्योतक आहे? काही विदर्भीय नेते स्वतःच्या विनाअनुदानित संस्था काढून इंजिनिअरिंग, एम. बी. ए., मेडिकल, नाही तर बी. एड. अशी व्यावसायिक महाविद्यालये काढून त्यातून माया गोळा करण्यात समाधान मानणारे आहेत. हे काय स्वतंत्र विदर्भ राज्यासाठी संघर्ष करणार? आंदोलन उभे करायला आत्मसंतुष्ट नेतृत्व कुचकामी असते. त्यासाठी सर्वसामान्यांच्या असंतोषाची नाडी ओळखून आंदोलन उभे करण्याची क्षमता असलेले दिशादर्शक नेतृत्व आवश्यक असते. विदर्भात आज रणजित देशमुख आणि विलास मुत्तेमवार हे विदर्भाच्या चळवळीत आघाडीवर दिसतात. त्यापैकी पहिले महाराष्ट्रात आणि दुसरे केंद्रात मंत्री होते. त्या वेळी सत्तास्थानी असताना त्यांना विदर्भाचा प्रश्न घेऊन लढा द्यावा, असे वाटले नाही. मंत्रिपद गेले आणि आता त्यांना स्वतंत्र विदर्भ राज्याची आठवण झाली! बुलढाण्याचे मुकुल वासनिक दिल्लीत रमलेत.[११] अशा नेत्यांची राजकीय विश्वासार्हता शून्याहूनही कमी झालेली असताना विदर्भातील कष्टकरी जनता त्यांच्यामागे उभी राहील, असे वाटत नाही. पश्चिम महाराष्ट्रातील नेत्यांना विदर्भातील आजच्या नेत्यांच्या पिढीतील ही दुर्बलता कळून चुकली आहे. मंत्रिमंडळात त्यांना स्थान आणि लाल दिव्याच्या 'घोडागाडी'ची सोय झाली की, मग त्यांना कोणतेही खाते द्या, त्यात ते समाधानी असतात! गृह, ऊर्जा, शिक्षण, सिंचन, महसूल, अर्थ अशी महत्त्वाची खाती पश्चिम महाराष्ट्राकडे ठेवली जातात. त्याचा परिणाम असा होतो की, वैदर्भीय नेते व्यक्तिशः गबर होतात आणि विदर्भ मात्र वाढत्या अनुशेषामुळे मागासलेला आणि कुपोषितच राहतो.

या नेतृत्वाला सध्या तरी विदर्भात दोन अपवाद दिसतात. एक जांबुवंतराव धोटे आणि दुसरे सध्या केंद्र सरकारातील नागरी उड्डयन मंत्री प्रफुल्ल पटेल. १९७०च्या दशकात जांबुवंतरावांनी 'महाविदर्भ चळवळी'चे नेतृत्व समर्थपणे केले होते. दोनदा ते खासदार म्हणूनही निवडून आले; पण एक तर स्वतःच्या राजकीय भूमिकेबाबत आणि पक्षनिष्ठेबाबत ते सदैव अस्थिरच राहिले. शिवाय आंदोलनाची रणनीती आणि स्वतंत्र विदर्भाच्या विकासाचे प्रारूप तयार करण्यासाठी लागणारी दूरदृष्टी (vision) आज तीन दशकानंतर त्यांच्यात कितपत आहे, याबद्दल शंका घ्यायला जागा आहे. शिवाय दोन-तीन महिन्यांपूर्वी 'स्वतंत्र विदर्भ राज्य निर्मितीसाठी आवश्यक वाटल्यास आम्ही नक्षलवाद्यांचेही सहकार्य घेऊ', असे त्यांनी केलेले वक्तव्य परिपक्वतेचे वाटले नाही. दुसरे, प्रफुल्ल पटेल हे धोरणी नेते आहेत. त्यांचे वडील गोंदियाला बिडी उद्योगात गर्भश्रीमंत झालेले. त्यांचे पटेल एकुलते एक चिरंजीव. ते सुशिक्षित आहेत. त्यांच्या वागण्या-बोलण्यात सुसंस्कृतपणा आणि सामंजस्य पदोपदी जाणवते. आयपीएल क्रिकेटच्या चमूच्या मालकी हक्काबाबत मध्यंतरी वाद निर्माण झाला. त्यात मात्र त्यांचे नाव गोवलेले होते. एवढे सोडल्यास त्यांची आजवरची कामगिरी नजरेत भरण्यासारखी आहे; मात्र त्यांना विदर्भाच्या राजकारणात फारसे स्वारस्य दिसत नाही. राष्ट्रवादीच्या साथीने केंद्रातच ते 'लंबी रेस का घोडा' बनू इच्छितात. त्यामुळे स्वतंत्र विदर्भ राज्यासाठी ते आंदोलनात उतरून स्वतःचे राजकीय भवितव्य पणाला लावतील, याची सुतराम शक्यता नाही.

## विदर्भ आंदोलन तेव्हाचे आणि आजचे

१९३०च्या दशकात सुरू झालेले आणि १९५५ ते १९७० पर्यंत धगधगत पेटलेल्या स्वतंत्र महाविदर्भ आंदोलनामागे विकासाबरोबरच किंवा त्याहूनही अधिक सांस्कृतिक वेगळेपण आणि अस्मितेचा मुद्दा होता. तो तात्त्विक मुद्दा आज फारसा प्रस्तुत नाही. मुंबई-पुणे-नाशिक त्रिकोणातील नव्या उद्योग - कॉर्पोरेट क्षेत्रात विदर्भातील तरुण-तरुणी मोठ्या संख्येने रोजगार मिळवून पश्चिम महाराष्ट्रात येऊन सहकुटुंब स्थायिक होऊ लागले आहेत; पण ही संधी त्यांना औद्योगिक क्षेत्राने दिली. त्यात पश्चिम महाराष्ट्रातल्या राजकीय पुढाऱ्यांनी कोणतेही कर्तृत्व अथवा पुरुषार्थ गाजवलेला नाही. दुसरा फरक म्हणजे, त्यावेळच्या नेतृत्वाला (अणे, बियाणी, रामराव देशमुख) एक भक्कम तात्त्विक बैठक होती. ते आत्मकेंद्री व आत्मलक्षी नव्हते. कुठलाही त्याग करण्याची त्यांची सिद्धता होती. आजचे नेतृत्व लाभाचे पद गेल्यामुळे अस्वस्थ झालेल्या मंडळींकडे आहे. असे सत्तेचे गुलाम आंदोलन करू शकत नाही. पदावरून हकालपट्टी झाल्यानंतर विदर्भाची आठवण करणारे हे नेतृत्व आहे. त्या वेळी अस्मितेचा मुद्दा प्रमुख, तर आज विकासाचा मुद्दा ऐरणीवर आहे; मात्र तो विश्वासार्हता गमावून बसलेले नेते उपस्थित करत आहेत, म्हणून त्याची परिणामकारकता जाणवत नाही.

स्वतंत्र विदर्भ होणे हे सर्व मराठी भाषिक जनतेच्या व्यापक हिताचे आहे. मराठी भाषेची दोन राज्ये झाल्याने हानी नव्हे, फायदाच होणे आहे, हे कळण्याचे डोळस शहाणपण आजच्या महाराष्ट्रातील नेत्यांना होईल आणि विदर्भ राज्य निर्मितीसाठी आत्मसमर्पणाची वृत्ती बाळगणारे नेतृत्व जेव्हा तयार होईल, तो सुदिन म्हणायचा. अन्यथा तेलंगणा राज्य येईल. झारखंड, छत्तीसगड, उत्तरांचल, हरियाणा ही वेगळी राज्ये झालीच; पण विदर्भ राज्य निर्मितीचे बापूजी अणे यांचे स्वप्न प्रत्यक्षात साकार होण्याची प्रतीक्षाच करावी लागणार, अशी चिन्हे दिसत आहेत.

### टिपा

१. अर्थात मुंबईतील गोळीबार आणि त्यात शंभराहून अधिक लोक हुतात्मे झाले, ते 'मुंबई शहर महाराष्ट्राज्यात आणि तेही राजधानी म्हणून राहावे' या मागणीसाठी होते (पेंडसे, २०१०, पृ. ५७६-७७). विदर्भाचे मराठी भाषिक जिल्हे संयुक्त महाराष्ट्रात यावेत, यासाठी ते हौतात्म्य नव्हते, याची नोंद घेतली पाहिजे. 'महाविदर्भ' असा वेगळा प्रांत व्हावा, यासाठी स्वतंत्रपणे आंदोलन त्या वेळी जोरात सुरू झालेले होते.

२. हा सर्व तपशील या आधीच्या प्रकरणांमधून विस्ताराने दिलेला आहे.

३. या मुद्द्याचा उल्लेख याआधी ससंदर्भ केलेलाच आहे.

४. न. चिं. केळकरांच्या 'केसरी'तील या लेखाचा महत्त्वाचा भाग बापूजी अणे यांच्या कैफियतीत इंग्रजी आणि मराठीत दिलेला आहे. त्यावरूनच इथे उद्धृत केला आहे (अणे, १९५४, पृष्ठे ७०-७१).

५. अशा प्रकारची टीका ब्रिजलालजी बियाणींवर मुंबईच्या 'विविधवृत्त' साप्ताहिकांत 'अलमगीर' या नावाने सदर लिहिणाऱ्याने १५ नोव्हेंबर १९५३च्या अंकात केली होती. त्याचा खरमरीत समाचार त्रिं. गो. देशमुखांनी 'मराठा जग' या साप्ताहिकात घेतला होता (देशमुख, १९९७ (I), पृष्ठे ६३-६७).

६. १९७७मध्ये झालेल्या जनता लाटेच्या वेळी नागपूरमधील एका जाहीर सभेत जांबुवंतरावांचे भाषण होते. त्या सभेत प्रस्तुत लेखक उपस्थित होते. सभेकडे येताना धोटे शे-दीडशे समर्थकांच्या एका मिरवणुकीने आले. त्यांच्या पुढे २०-२५, सोबत २०-२५ आणि मागे ४०-५० जण अशा मिरवणुकीत 'आया रे शेर, वाह रे शेर' अशा जोरदार घोषणा दिल्या जात होत्या. अशा थाटात घोषणांच्या तालावर नाचणाऱ्या समर्थकांनी धोटे यांना सभास्थानी आणले. ते भाषणासाठी उभे राहिले, तर पहिले १०-१५ मिनिटे 'आया रे शेर, वाह रे शेर' अशा घोषणा समर्थक देत राहिले. ज्याला मदन धनकर 'नाट्य आणि आकर्षक मैदानी घोषणा' म्हणतात, त्या ह्याच. हे कोणालाही तेव्हा पटले असते.

अनुक्रमणिका





७. कळमकरांनी पुस्तिका तयार करताना बापूजी अणे यांनी राज्य पुनर्रचना आयोगाला सादर केलेल्या कैफियतीतील बहुतेक महत्त्वाचे मुद्दे त्यांच्या पुस्तिकेत वापरलेत; पण कळमकरांच्या एकूण मांडणींवर ब्रिजलालजी बियाणींच्या आजचा व उद्याचा विदर्भ ह्या विस्तृत निवेदनातील एकूण धाटणी व आकृतिबंध, तसेच आर्थिक स्वयंपूर्णते बाबतच्या आकडेवारीचा प्रभाव अधिक दिसतो.

लोकजागृती आणि राष्ट्रीयत्वाची भावना रुजवण्यासाठी जसा सार्वजनिक गणेशोत्सव व शिवजयंत्युत्सव हा साजरा करण्याचा उपक्रम सुरू केला, त्याच धर्तीवर बापूजी अणे यांनी नागपुरात 'विदर्भ चंडिका' स्थापन करून एक सप्ताह कार्यक्रम करण्याचा प्रघात सुरू केला. गणेशोत्सव संपल्यानंतर लगेचच हा कार्यक्रम सुरू होत असे आणि त्याला लोकांचा प्रचंड प्रतिसाद महाविदर्भ आंदोलनाच्या काळात मिळाला.

९. पश्चिम महाराष्ट्रातील नेते आणि विदर्भाचे नेते यांनी एकत्रितपणे विचारविनिमय करून ८ ऑगस्ट १९४७ मध्ये अकोला करार केला होता. त्यावर वैदर्भीय नेत्यांतर्फे बॅ. रामराव देशमुखांची सही होती. तसेच इतरही काही नेत्यांच्या सह्या होत्या. मुख्य म्हणजे करारावर महाराष्ट्रातर्फे आचार्य शंकरराव देव आणि विदर्भातर्फे ब्रिजलालजी बियाणी यांच्या सह्या होत्या; पण मुळातच हा करार 'उपप्रांत' (Sub-province) ही संकल्पना भारतीय राज्यघटनेत मान्य होईल, या गृहीतकांवर केला गेला (अकोला करारातील महत्त्वाच्या मुद्द्यांसाठी देशमुख, २००७ (I), पृष्ठे ३२-३३).

१०. असा परखड सवाल मा. गो. वैद्य यांनी टी. जीं.च्या पुस्तकाला लिहिलेल्या अभ्यासपूर्ण प्रस्तावनेत विचारला आहे (देशमुख, २००७ (I), पृष्ठ १९).

११. बाळकृष्ण वासनिक (मुकुल वासनिकांचे वडील) यांनीही बुलढाणा राखीव मतदार संघातूनच निवडणूक लढवली होती. त्यांनी १९७० मध्ये 'महाविदर्भ संघर्ष समिती'तर्फे एक कैफियत तयार करून राष्ट्रपतींकडे ४० वर्षांपूर्वी पाठवली होती, याचेही मुकुल वासनिक या विद्यमान केंद्रीय राज्यमंत्र्याला आता विस्मरण झाले असावे!

**संदर्भसूची :**


१. आंबेडकर, प्रकाश २०१०, : "विदर्भ : घटनात्मक पेचप्रसंग", **लोकसत्ता** (रविवार) १४ फेब्रुवारी, पृष्ठ ६.

२. कळमकर, आनंदराव १९७०, : **विदर्भ राज्याची स्वयंपूर्णता,** नागपूर : अखिलचंद्र टावरी, सरोज मुद्रणालय.

३. काळे, या. मा. १९२८, : **वऱ्हाडचा इतिहास,** नागपूर.

४. केळकर, का. न. (संपा.) १९४१, : **न. चिं. केळकर कृत गतगोष्टीची पुरवणी** (पत्रव्यवहार), पुणे : प्रकाशक का. न. केळकर.

५. जामकर, किशोर २०००, : "वेगळा विदर्भ : फाजलअली आयोगाच्या अहवालात नेमके आहे तरी काय?", **लोकसत्ता,** पुणे, २८ ऑगस्ट २०००, पृष्ठ ८.

६. देशमुख, टी. जी. २००७ : **चौदावे रत्ने** (स्वतंत्र विदर्भविषयक अग्रलेखांचा संग्रह) (संपा. द. भि. कुलकर्णी), नागपूर : पां. ना. बनहट्टी प्रकाशन.

७. देशमुख, बॅ. रामराव, १९४८, : **'अध्यक्षीय भाषण'**, संयुक्त महाराष्ट्र परिषद, मुंबई अधिवेशन (१६ ऑक्टोबर १९४८), मुंबई : मौज प्रिंटिंग ब्युरो.

८. धनकर, मदन २०१०, : 'विदर्भ राज्यवादी नेतृत्व', **साप्ताहिक साधना,** वर्ष ६३, अंक १-२, ६३ वा वर्धापनदिन विशेषांक, पृष्ठे ६४-६८.

९. पेंडसे, लालजी २०१०, : **महाराष्ट्राचे महामंथन** (दुसरी आवृत्ती) मुंबई : लोकवाङ्मय गृह.

१०. बियाणी, ब्रिजलाल १९५५, : **आजचा व उद्याचा विदर्भ,** नागपूर : शासकीय मुद्रणालय.

११. मोहनी, ह. कृ. १९४३, : **महाविदर्भाची रूपरेषा,** नागपूर : महाविदर्भ प्रकाशन व प्रचारक मंडळ.

१२. वैद्य, मा. गो. १९८१, : **"टी. जीं. चे अग्रलेख - एक दस्तावेज",** पहा : देशमुख, टी. जी. २००७. (पूर्वोल्लेखित).







१३. हराळे, संजय पां. १९९१, : **'विदर्भ केसरी स्व. ब्रिजलाल बियाणी यांचे राजकीय व सामाजिक विचारांचे विश्लेषणात्मक अध्ययन'**, (एम्. फिल्. प्रबंध-राज्यशास्त्र), अमरावती विद्यापीठ.

१४. Aney, M. S. 1954, : Memorandum submitted to the States Reorganisation Commission, Yeotmal : Yeotmal District Association.

१५. Mahavidarbha Sabha 1943, : 'A Case for Mahavidarbha Province' (Address delivered at the Mahavidarbha conference by Rt. Hon. M. R. dayakar), Nagpur : Mahavidarbha Sabha H. O. - The Tarun Bharat.

१६. Sitaramayya, B. Pattabhi 1946, : Convention on Linguistic and Cultural Provinces in India, Delhi - 8th December 1946, Delhi.

१७. Wasnik, B. 1970, : "Memorandum on Separate State of Mahavidarbha" (by a Thousand Representatives of Vidarbha), Nagpur : Mahavidarbha Rajya Sangharsha Samiti.

☆☆☆

# केवळ पत्रकारिता शिक्षण नव्हे, समग्र समाजालाच संवाद-माध्यम शिक्षित करण्याची गरज आहे

डॉ. श्रीपाद भालचंद्र जोशी

पुणे विद्यापीठाच्या संज्ञापनशास्त्र आणि पत्रकारिता विभागाने नुकतीच या देशातील पत्रकारिता शिक्षणाच्या क्षेत्रातील अध्यापक-अभ्यासकांची एक परिषद आयोजित केली होती. पत्रकारिता शिक्षणासंबंधांच्या विविध आया-मांची एवढ्या गांभीर्याने चर्चा करणारी निदान महाराष्ट्रातील तरी ही पहिलीच अशी परिषद होती. महाराष्ट्रातील सर्वच विद्यापीठातील पत्रकारिता विभागांचे विभाग-प्रमुख, शिक्षक, निवृत्त शिक्षक, निवृत्त विभाग प्रमुख, तसेच माध्यमांचे प्रतिनिधी, माध्यमांचे अभ्यासक असा संबंधित परिवार या परिषदेत मोठ्या प्रमाणावर सहभागी होता. पत्रकारिता शिक्षणासंबंधाने या परिषदेत झालेली चर्चा व उपस्थित केले गेलेले मुद्दे या आधारावरील विवेचन, या शिक्षणाची जनसामान्यांसाठी असणारी व्याप्ती लक्षात घेता, प्रस्तुत लेखात केले आहे. महाराष्ट्रातील या पहिल्या वहिल्या पत्रकारिता अध्यापकांच्या परिषदेच्या निमित्ताने हा विषय वाचकांच्या पातळीपर्यंत चर्चेसाठी आणून सोडला गेला हेच या परिषदेचे मोठे फलित होय.

प्रस्तुत लेखकाने या विषयावर वेळोवेळी आपली व्याख्याने, व्याख्यानमाला, उद्‌बोधन-प्रबोधन वर्ग, या विषयावरील विविध ग्रंथ, परिषदा तसेच अनेक यंत्रणांना पाठविलेली या बाबतची निवेदने इत्यादीमधून केवळ पत्रकारिता शिक्षणच नव्हे तर एकूणच माध्यम शिक्षण, ज्याचा पत्रकारिता शिक्षण हे केवळ एक भाग आहे आणि त्याहून पलीकडचे म्हणजे संपूर्ण समाजालाच माध्यम शिक्षित करण्याची गरज व त्यासाठी आवश्यक ती चळवळ उभारणे याकडे वारंवार लक्ष वेधलेले आहे. या अध्यापक परिषदेतही ते वेधले होतेच.

या संबंधाने प्रश्न हा फक्त 'चुकते कोणाचे व कुठे' एवढ्यापुरता मर्यादित राखून उपयोगाचे नाही. कारण चुकण्यासाठी सुद्धा अगोदर निश्चित स्वरूपाची अशी दिशा व तिचे दिग्दर्शन उपलब्ध असण्याची गरज आहे. तेव्हाच चुकले की बरोबर हे ठरवता येईल. तेच अद्याप झालेले नाही. पत्रकारिता अथवा माध्यम शिक्षणासंबंधाने कोणतीच अद्ययावत जाणच आपल्या देशात उपलब्ध नाही. अथवा ती कशी असावी यावर काही दखलपात्र व्यापक विचारमंथन देखील नाही.

'पत्रकारिता शिक्षण' या संज्ञेचीच अवस्था तर फारच चिंताजनक आहे. 'पत्रकारिता' अथवा 'माध्यम' व्यवसायात असलेल्या वा राहून झालेल्यांनाच तेवढे अभ्यासक समजून त्यांनी दिले-घेतलेले शिक्षण म्हणजे पत्रकारिता शिक्षण एवढीच सर्वमान्य व्याख्या करून काल-परवापर्यंत सारे चालले होते. या व्यवसायाबाबत त्यांना जे वाटते वा ठाऊक आहे त्या आधारावर त्यांनी दिलेले 'शिक्षण', 'प्रशिक्षण' वा त्यांच्या आत्मनिवेदनाच्या, अनुभवाच्या आधारे जे उद्‌बोधन तेच अधिक महत्त्वाचे व तेच पत्र-कारिता शिक्षण समजण्याचा एक कालखंड होता. तसा अद्यापही तो अनेक ठिकाणी संपुष्टात आलेला आहे असे नाही.

जिथे साधे ट्रेडल मशीनही नव्हते अशा ठिकाणी देखील पत्रकारिता शिक्षण दिले जावे याची परवानगी यंत्रणांनी देऊन झालेली होती. ही देखील या शिक्षणाच्या चिंताजनक असण्याची स्थिती लक्षात घेतली पाहिजे.

ज्या-ज्या विद्यापीठांमध्ये हे विभाग आहेत त्यांच्या बहुतेक कुलगुरुंना तर अनेक वर्षेपर्यंत हे विभाग हे आपल्या प्रशासनाचा, विद्यापीठाचा प्रसिद्धी व जनसंपर्क विभाग म्हणूनच वापरण्यात अधिक रूची राहिली होती.

आपला कालखंड सुखेनैव पार पाडण्यासाठी लागणारी स्थानिक वृत्तपत्र व माध्यमांची मदत मिळावी म्हणून त्यांना उपकृत करण्यासाठी काही कुलगुरूंनी तर केवळ आपल्या अधिकारात अभ्यासक्रम तयार करून पत्रकारिता शिक्षणातील स्नातकोत्तर पदव्याही काही पत्रकारांना वाटून झाल्या आहेत. पुढे ते अभ्यासक्रम विद्यापीठ अनुदान आयोग व कुलपतींनी नियमबाह्य म्हणून बंदही करून झाले आहेत. याहून अधिक पत्रकारिता शिक्षणाची या

देशात दुर्दशा ही काय असावी?

या देशातील पत्रकारिता शिक्षण स्थानिक वृत्तपत्रे, माध्यमे तसेच कुलगुरूंचे सुव्यवस्थापन करू शकतील अशा प्रिंट मिडियामधील व्यक्ती वा संस्था-संघटना यांच्या प्रभावाखाली तर कधी त्यांच्या प्रामाणिक सहकार्याने अनेक वर्षे चालविले गेले. हे या शिक्षणाच्या एकीकडे वृद्धीचे तर दुसरीकडे चिंताजनकतेचेही सर्वाधिक महत्त्वाचे कारण ठरले.

एकीकडे या ज्ञानशाखेतील तज्ज्ञता जाणीवपूर्वक निर्माणच करायची नाही व दुसरीकडे ती नाही म्हणून कुठल्याही अन्य विद्याशाखेतील शिक्षकाला अतिरिक्त भार म्हणून, ती जबाबदारी देऊन हे शिक्षण देण्याचा उद्योग अनेक विद्यापीठांनी अनेक वर्षे चालवला होता. आता महाविद्यालये ही चालवत आहेत. या ज्ञानशाखेसाठी शिक्षकांची स्वतंत्र भरपूर पदेच एकतर निर्माण केली जात नाहीत. केलीच तर वर्षानुवर्षे ती रिकामीच ठेऊन स्थानिक पत्रकारांना 'अभ्यागत' म्हणून बोलावून शिक्षक-प्राध्यापकांचा दर्जा मिळवून देण्यासाठी त्यांना उपकृत केले जाते. विद्यापीठ चालविण्यासाठी त्यांच्या सहकार्याची कोणत्याही कुलगुरूला कोणापेक्षाही अधिक गरज असते. विद्यापीठाचा पत्रकारिता विद्या विभाग हा त्यासाठी अनेक वर्षे साधनीभूत ठरला, ठरवला गेला आहे. त्यामुळेच या शिक्षणाची स्वतंत्र विद्याशाखा म्हणून जाणीवपूर्वक हेळसांडच केली गेली आहे. या ज्ञानशाखेतील स्वतंत्र व स्वायत्त तज्ज्ञ शिक्षकापेक्षादेखील प्रत्यक्ष व्यवसायातील, मग तो वर्तमानपत्रातला वा छापखान्यातला अगदी मुद्रक वा प्रूफरीडर जरी असला तरी तो वृत्तपत्रात, आकाशवाणी व दूरदर्शनमध्ये काम करतो, छापखाना चालवतो म्हणून त्याला अधिक कळते असाच समज बाळगणारे कुलगुरु, प्राचार्य, व्यवस्थापन व धोरणकर्ते यांच्यामुळे, पत्रकारिता शिक्षणाचा या देशातला दर्जा हवा तसा नव्हता व नाही याचे अजून एक महत्त्वाचे कारण. पत्रकारिता ही मुळात संवाद-जनसंवाद-जनमाध्यम-विद्या आहे व तिचा इतर अनेक ज्ञानशाखांशी संबंध पोचतो याचे पुरेसे भान असणारे कुलगुरूशिक्षणतज्ज्ञ-धोरण-निर्णयकर्ते वा राज्यकर्ते अद्याप आपल्याला लाभायचे आहेत हे या ज्ञानशाखेची हेळसांड होण्याचे सर्वाधिक महत्त्वाचे कारण आहे. आमचे एक स्नेही राहिलेले 'मार्क्सवादी' कुलगुरु तर मार्क्सच्याच पत्रकारितेविषयीच्या काही उद्‌गारांचा दाखला देत पत्रकारिता विद्याविभागाचीच मुळात विद्यापीठात कशी गरज नाही हे सैद्धांतिकदृष्ट्या मला नेहमी पटवून देत असत. आता ते हयात नाहीत.

इथे फक्त व्यावहारिक कारणांची तेवढी मांडणी करतो आहे. फार सैद्धांतिक पातळीवर येथे जात नाही. ती कारणे अधिक विस्ताराने अन्यत्र मांडवी लागतील. त्याचे हे स्थान नाही.

या देशातील पत्रकारिता-माध्यम शिक्षणाची स्वतंत्रपणे कल्पना करण्यासाठी आणि संवाद-जनसंवाद-जनमाध्यम यांचे आणि संस्कृती-समाजाचे-व्यक्तीचे व विकासाचे एकूणच नाते नीट समजून घेऊन ते सुस्थापित करण्याची जेवढी गरज पंडित जवाहरलाल नेहरू ह्या देशाच्या पहिल्या व द्रष्ट्या पंतप्रधानाला भासली होती ती व तशी गरज भासणारे राज्यकर्तेही पुढे आपल्याला लाभले नाहीत. देशाच्या विकासाच्या स्वप्नपूर्तीसाठी मोठमोठ्या राष्ट्रीय संस्थांचे जे संस्थात्मक जाळे नेहरूंनी विणले त्यातच 'नॅशनल स्कूल ऑफ ड्रामा' होती. तशीच भारतीय जन-संचार संस्थान, 'इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ मास कम्युनि-केशन'चीही कल्पना त्यांनी केली होती.

प्रख्यात जनमाध्यम-जनसंवाद तज्ज्ञ विलबर श्रम ह्यांना ही संस्था उभारण्यासाठी नेहरूंनी मुद्दाम बोलावून घेतले होते. दुर्दैवाने पंडित नेहरूंनी उभारलेल्या सर्वच भव्य-दिव्य कार्याची, संस्थांची व संस्थात्मक मार्गाने नियोजित विकासाची पुढे बाजाराने व राज्यकर्त्यांनी मिळून संयुक्तपणे जी वाट लावली त्यात इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ मास कम्युनिकेशन मार्फत या शिक्षणाची देशभर जी पहाट ज्या पद्धतीने उगवणे अपेक्षित होते ती अजूनही तशीच अंधारलेली आहे.

पत्रकारिता अथवा संवाद-माध्यम शिक्षणाचे सध्या अस्तित्वात असलेले जगातले सारेच अभ्यासक्रम, ज्यावर आपले अभ्यासक्रम बेतलेले असतात हेच मुळात आज मागास ठरावेत, इतके संवाद-माध्यम-तंत्रज्ञानाचे विश्व व त्यांनी निर्मिलेले संबंधित वास्तव पुढे निघून गेले आहे.

हे सारे अभ्यासक्रम व ते शिकविणारे, त्याचे शिक्षण

ही केवळ 'वेपन्स ऑफ मास इन्स्ट्रक्शन्स' तेवढी झाली असून ते सारे त्वरित नष्ट करण्याची सर्वप्रथम गरज आहे, अशी एक विचारधारा आज जगभरच या शिक्षणाच्या क्षेत्रात प्रबळ आहे. त्या विचारधारेनुसार त्या जागी, त्वरेने 'इंटिग्रेटेड', 'कॉन्हवर्जंट', 'एकात्म', 'संमिश्र' अशी अभ्यासकांची पुनर्रचना करण्याची नितांत गरज आहे. इतिहास, भाषा, भाषाशास्त्र, समाज, संस्कृती, अर्थकारण, राजकारण, पर्यावरण-विज्ञान, उद्योग, व्यवस्थापन, संवादशास्त्र, माध्यम, जनसंवाद, जनमाध्यम विद्या, संवाद-माध्यमांचे नवतंत्रज्ञान, प्रात्यक्षिके, मानसशास्त्र, समाजविज्ञान या व अशा आजचे जनजीवन साकारणाऱ्या ज्ञानशाखांमधील महत्त्वपूर्ण विविधांगी ज्ञानाचा आवश्यक तो व तेवढा समन्वय करून देणारे पत्रकारिता-संवाद-माध्यम शिक्षण ही काळाची गरज आहे. त्यासाठी पत्रकारिता शिक्षण देणारे विद्यमान अभ्यासक्रम मोडीत काढण्याची गरज आहे. वेगवेगळ्या पातळ्यांवर विलग होता येऊनही तिथवरची परिपूर्तता प्राप्त करता येईल व ज्यांना सलगपणे पुढे जायचे आहे, त्यांना जाताही येईल अशा प्रकारच्या; रूढ स्नातक वा स्नातकोत्तर अभ्यासक्रमापेक्षा वेगळ्या प्रकारच्या संरचनेची या शिक्षणाला गरज आहे. त्यासाठी वैद्यकीय शिक्षण अथवा चार्टर्ड अकाऊंटटसाठी असलेले शिक्षण नियंत्रित करणाऱ्या यंत्रणांसारखी स्वतंत्र 'इंडियन जरनॅलिझम अँड कम्युनिकेशन एज्युकेशन अँड रिसर्च कौन्सिल' स्थापण्याची गरज आहे.

वैद्यकीय वा कायदेविषयक शिक्षणाप्रमाणे १०-१२ वी नंतर सलग व विलग होता येणारी अशी तीन-चार-पाच वर्षांची या शिक्षणाची रचना आवश्यक आहे. प्रस्तुत लेखकाने 'गोखले संवाद' व 'माध्यम अध्ययन संशोधन' संस्थेमार्फत परकीय भाषा शिक्षणाच्या रचनेच्या धर्तीवर दहावीनंतर प्रि-डिप्लोमा, ज्युनियर डिप्लोमा व हायर डिप्लोमा अशी रचना असणारे विविध उप-विषयांचे अभ्यासक्रम तयार करून ते राबविण्याचा एक यशस्वी प्रतिसाद लाभलेला प्रयोग नव्वदीच्या दशकात मध्यभारतात सेवाभावी क्षेत्रात करून बघितलेला होता हे येथे आवर्जून नमूद करणे आवश्यक आहे. अमेरिकन जरनॅलिझम एज्युकेशन ॲक्रिडेशन यंत्रणेच्या, अमेरिकेतील विद्यापीठातील, तेव्हा भारताच्या दौऱ्यावर असणाऱ्या प्रो. गिलेलँड आणि प्रो. बुंग ह्यांनी त्यावेळी संस्थेस भेट दिली होती व अशा प्रयोगांची या शिक्षणाला कशी गरज आहे हे त्यांनी त्या भेटीत लेखी नमूद करून ठेवले आहे.

पत्रकारिता-माध्यम-संवाद-जनसंवाद विद्येच्या एकूणच अस्तित्वाची दखल या देशात राज्यकर्त्यांनी सर्वप्रथम घेतली ती पहिल्या प्रेस कमिशनच्या माध्यमातून. ही केवळ वृत्तपत्रांसाठी आकाशवाणीसाठी लागणारे वार्ताहर, संपादक, निवेदक, तंत्रज्ञ असा 'स्टाफ' तेवढा 'शिक्षित' करण्यापेक्षाही 'प्रशिक्षित' करून तो या माध्यमांच्या कामी यावा एवढ्या पुरतीच. लॉर्ड मेकॅलेने ब्रिटिशांना हवे असणारे 'कारकून' तयार करण्यापुरती दिलेली शिक्षण व्यवस्था हाच या पातळीवरचा राज्यकर्त्यांचा आदर्श होता.

दुसऱ्या प्रेस कमिशननंतर त्यात भर पडली ती फक्त दूरचित्रवाणी माध्यम आल्यामुळे त्या माध्यमासाठी लागणारे शिक्षण-प्रशिक्षण उपलब्ध करून देण्याची आणि संवाद-माध्यमांना केवळ शिक्षणाचे तंत्रज्ञान, 'एज्युकेशनल टेक्नॉलॉजी' समजण्याची. तिसरे प्रेस कमिशन अजूनही नाही. आता त्याला प्रेस कमिशन न म्हणता 'मिडिया कमिशन' म्हणण्याची गरज आहे. एवढे हे क्षेत्र विस्तारले आहे. तशी मागणी करून संवाद-पत्रकारिता-जनसंवाद विकसित करणारी शिक्षणाची नवी लोकानुवर्ती, केवळ बाजारानुवर्ती नव्हे तर ती, दृष्टी विकसित करण्याची नितांत गरज आहे.

भारतातले पत्रकारिता शिक्षण व त्याची सद्यःस्थितीदेखील सर्वत्र एकसारखी नाही. मेट्रो, नागरी, अर्धनागरी व ग्रामीण असे भाग करून त्याकडे बघावे लागेल. नागरी वा मेट्रोमध्ये उपलब्ध असलेले 'सिम्बॉयसिस' वा दूरचित्रवाहिन्यांचे व वृत्तपत्रांचे व्यवसाय प्रशिक्षणाचे स्वतःचे उपक्रम, त्यांची साधने, प्रशिक्षणाच्या सोयी, दर्जा, गुणवत्ता या त्याच भागातील इतर सर्व शैक्षणिक संस्थांमध्ये सारख्या नाहीत. कुठे आहेत त्या अपुऱ्या, तुटपुंज्या, कुठे तर त्या नाहीतच. शिक्षक तर कुठेच पूर्णवेळ आणि पुरेसे नाहीत. ते नकोच आहेत. तासाच्या हिशोबावर पैसे देऊन चाललेली ही दयनीय वेठबिगारी आहे. नागरी, अर्ध-नागरी, ग्रामीण भागात तर शिक्षकाची








स्वाक्षरी कितीही रुपयांवर असो प्रत्यक्षात मात्र ५,००० रुपये, ८,००० रुपये फारच झाले तर १०-१२ हजार रुपये एवढा तुटपुंजा, अत्यल्प पगार आहे. त्या शिक्षकांकडून कोणत्या दर्जा-गुणवत्ता यांची कोणती अपेक्षा पूर्ण करायला आपण त्यांना सांगणार आहोत? त्यातही अनेक ठिकाणी हे अभ्यासक्रम इतर विषयातल्या शिक्षकांच्या जागा टिकवण्यासाठी, (कारण त्या टिकवणे, भरणे हे तर व्यवस्थापनाच्या उत्पन्नाचे मुख्य साधन आहे) त्या शिक्षकांना हे अभ्यासक्रम शिकवायला देऊन चालवले जातात, अशी स्थिती आहे.

भारतीय भाषांमधून, प्रस्तुत लेखकासारखेच काही ग्रंथलेखक वगळल्यास या विषयासंबंधाने ग्रंथ लेखन करण्याची गरज कोणाला वाटत नाही. कारण त्याला कोणी एखादा अपवाद वगळता पुरस्कार देत नाही वा त्यांचा कोणी गौरव करत नाही. जोवर विद्यापीठांच्या स्वायत्ततेबद्दल आपण थोडेतरी सजग होतो त्याकाळात 'थ्रस्ट एरिया', म्हणजे कोणत्या प्रदेशात, राज्यात कशावर भर द्यायचा हे विद्यापीठ अभ्यासमंडळे ठरवीत असत. त्यावेळी त्या विभागाच्या गरजा, सोयी, साधनांची उपलब्धता बघून तरी किमान अभ्यासक्रम ठरवले जात होते. त्यावेळी उत्तम लेखनाची कौशल्ये, भाषिक कौशल्ये, प्रात्यक्षिके यावर अधिक भर होता. आज राज्यातल्या राज्यकर्त्यांना शिक्षणाचा खर्च जितका केंद्राकडून घेता येईल तेवढा हवाच असल्याने शिक्षण हा आता नावालाच केंद्र-राज्याच्या सामायिक सूचीतला विषय उरला आहे.

विद्यापीठांच्या स्वायत्ततेबाबत त्यामुळेच आता बोलणेही आपण सोडूनच दिले आहे. कारण आपले पाच-सहा आकडी पगार केंद्राच्या भरवशावरच सुरक्षित आहेत. त्यामुळे शासनाच्याच शिक्षण विभागाचे स्वरूप विद्यापीठांना आलेले आहे. कारण केंद्राला विद्यापीठ अनुदान आयोगामार्फत सारा देश एकसारख्या गरजांचा, एकसारख्या चेहेऱ्यांचा व एकसारख्या मेंदूचा करून सोडण्यासाठी पूर्ण देश हा एखाद्या गावासारखा एकच 'एकक' समजायचा आहे. त्यासाठी सरसकट सर्वत्र सर्वच विषयांच्या एकाच समान अभ्यासक्रमाची रचना करायची आहे. पत्रकारिता-माध्यम शिक्षणाकडे तर केवळ वृत्तपत्र व माध्यम व्यावसायिक व उद्योगांच्या गरजा आणि त्याही जेमतेम भागवण्यापुरती लागणारी मानवी यंत्रसामुग्री तयार करण्याची आणि तिही अर्धवट, तुटपुंजी असा कारखाना अशा स्वरूपातच बघितले जाते.

मात्र या पुढच्या दशकभरातच संवादाच्या झपाट्याने विकसित होणाऱ्या नवतंत्रज्ञानामुळे सत्तर टक्के वृत्तांची निर्मिती ही वृत्तपत्रे व रुढ पत्रकार करणार नसून स्वतः लोकच करणार आहेत. लोकच स्वतः आपले 'माध्यम' होणार आहेत.

वेगाने प्रगत होत गेलेले संवाद-माध्यम-जनसंवाद याचे नवतंत्रज्ञान हा प्रत्येकाच्या व समाजाच्या जीवनाचा आज अविभाज्य भाग आला आहे. लोकांच्या मेंदूचे सर्वंकष नियंत्रण करणारा व जीवनाचे अग्रक्रम ठरवणारा तो महत्त्वाचा घटक झाला आहे. ही नवतंत्रज्ञाने आज राज्यक्रांतीची देखील सामुग्री ठरू पहात आहेत. तरीही समाजातील प्रत्येकालाच माध्यम शिक्षित करण्याचे, या विषयाबाबतचे राज्यकर्त्यांचे अधिकृत धोरणच नाही. संवाद-माध्यमांचे प्रत्यक्षातले विश्व, त्याने माणसाचे जे काय केले आहे ते आणि त्याचे औपचारिक शिक्षण ह्यात प्रचंड मोठी दरी निर्माण झाली आहे. प्रस्तुत लेखकासारखे या विषयासंबंधाने अशी दृष्टी बाळगलेल्या काही व्यक्ती आपापल्या व्यक्तीगत पातळीवर आपल्या ग्रंथलेखनातून, व्याख्यानातून, उद्बोधन वर्गातून, सभा-संमेलनातून समाजाला जे माध्यमशिक्षित करत असतील, लोकपत्रकारितेचे, लोकहितकारी वळण लावत असतील तेवढीच व त्याच प्रमाणात माध्यम साक्षरतेची चळवळ आज उभी आहे. विद्यापीठ, महाविद्यालयांकडून औपचारिकरित्या दिले जाणारे पत्रकारिता-संवाद-माध्यम शिक्षण हीच मुळात व्यापक प्रमाणावर प्रत्येकालाच माध्यमशिक्षित करणारी मोठी चळवळ म्हणून उभी होण्याची आज गरज आहे. प्रत्येकाला राष्ट्रीय ओळखपत्र दिल्या जाण्याइतकेच किंबहुना त्याहूनही ते अधिक गरजेचे आहे. कारण त्या शिवाय माणसांची हरवलेली ओळख व त्या ओळखीशी त्यांचा स्वसंवादच साधला जाऊ शकत नाही. मात्र अशी शैक्षणिक-वैचारिक माध्यम शिक्षणाची चळवळ ही अंतिमतः बाजारवादाच्या, नफेखोरांच्या हितसंबंधांना पोषक नसल्याने शासकीय धोरणाचा, पत्रकारिता-माध्यम शिक्षणाचा केंद्रबिंदू हा फक्त बाजार आणि त्यासाठी

आवश्यक असणारा माध्यमउद्योग एवढाच आहे. अद्यापही संपूर्ण समाज, प्रत्येक नागरिक, प्रत्येक व्यक्ती हा शिक्षणाचा केंद्रबिंदू नाही. तो होत नाही तोवर संवाद-माध्यम शिक्षणाला या पुढे अर्थच नाही.

अजूनही या विषयाकडे कुठे कला, कुठे कौशल्य, कुठे तंत्र, कुठे व्यावसायिक प्रशिक्षण, कुठे समाजविज्ञान तर कुठे स्थापत्यविज्ञान म्हणून बघितले जाते.

या साऱ्या पार्श्वभूमीवर या ज्ञानशाखेला स्वतंत्र ज्ञानशाखा म्हणून बघितले जावे यासाठी प्रस्तुत लेखकासह काही व्यक्तींनी अनेक वर्षांपासून वेगवेगळे प्रयत्न वेग-वेगळ्या पातळ्यांवर चालवले आहेत. रुढ विद्यापीठांमध्ये अद्यापही या विषयाची स्वतंत्र ज्ञानशाखा, 'फॅकल्टी' नाही, कुठे कला शाखेत तर कुठे व्यवस्थापन, कुठे समाजविज्ञान तर कुठे अन्य काही अशा ज्ञानशाखांवर हा विषय टांगला गेला आहे. त्याला स्वतंत्र डीन, अधिष्ठाता नाही, कुठे भूगोलाचा तर कुठे इतिहासाचा, कुठे अर्थ-शास्त्राचा, कुठे मराठीचा, कुठे इंग्रजीचा, कुठे कॉमर्सचा तर कुठे मॅनेजमेंटचा शिक्षक या विषयाचा अधिष्ठाता असतो. तो या ज्ञान शाखेला काय न्याय देणार आणि काय वळण लावणार? कुलगुरु तरी त्याचा काय विकास करणार? जामिया मिलिया इसलामियाच्या धर्तीवर मध्य-प्रदेश, छत्तीसगढसारख्या राज्यात स्वतंत्र पत्रकारिता विश्व-विद्यालये राज्याने स्थापली. महाराष्ट्रातही 'स्वतंत्र संवाद-माध्यम विद्यापीठे' स्थापन करून सर्व संबंधित व आंतर-ज्ञानशाखीय अशा विषयांच्या स्वतंत्र फॅकल्टी, त्याला स्वतंत्र अधिष्ठाता, त्यांना प्रत्येक उपविषयाचे स्वतंत्र विभाग करून देण्याची त्वरित गरज आहे. एवढे पत्रकारिता संवाद-माध्यम शाखेतले ज्ञान-तंत्रज्ञान विकसित होत आज पुढे गेले आहे.

छत्तीसगढच्या तुलनेत तर महाराष्ट्रात प्रत्येक भागात तर अशी किमान चार स्वतंत्र संवाद-माध्यम विद्यापीठे स्थापन करून त्यांना स्वतःची मुद्रणालये, रेडिओ स्टेशन्स, दूरचित्रवाणी केंद्र, त्यासाठी सामुग्री, तंत्रज्ञ, स्टुडिओ, प्रक्षेपणाच्या सोयीच नव्हे तर स्वतंत्र उपग्रह वाहिनीदेखील उपलब्ध करून देण्याची वेळ कधीच आली आहे. मात्र त्यासाठी प्रयत्न करणाऱ्या आमच्यासारख्यांच्या मागण्या-निवेदनांची साधी पोचदेखील वर्षानुवर्षे उलटूनही संबंधितां-कडून कधी दिली जात नाही. ही कोणाची चूक?

प्रस्तुत लेखकानेच अशा संवाद-माध्यम विद्यापीठा-साठी गेले दशकभर काही लोकांसह प्रयत्न चालविले असून आजवर किमान चार मुख्यमंत्र्यांना वारंवार पत्रे, निवेदने, स्मरणपत्रे देऊन झाली आहेत. सभा-संमेलनातून ठराव करून झाले आहेत. त्याची साधी पोचही देण्याचे सौजन्य जिथे राज्यकर्त्यांमध्ये उरलेले नाही तिथे आपण आपसातच कोणा बहुजनांच्या आणि कोणा अभिजनांच्या चुका काढत बसणार आहोत? त्याही अगोदर म्हणजे सुमारे वीस वर्षापूर्वी प्रस्तुत लेखकाने संवाद-माध्यम-पत्रकारिता शिक्षणाची या देशातील स्वतंत्र रचना कशी असावी याचा एक संक्षिप्त आराखडा सादर केला होता. 'Frontiers of Communication' ह्या ग्रंथात तो अद्यापही उपलब्ध आहे. पण तिकडे बघायची गरज आहे कुणाला? संवाद-पत्रकारिता-माध्यम शिक्षण क्षेत्रात एकतर पुरेसे शिक्षक-प्राध्यापक दिले जात नाहीत, जे मूठभर आहेत त्यांची संघटना नाही. ती बांधण्याची कोणाची इच्छा वा तयारी नाही. संघटना झाली तरी नोकरीत असणारे ना एवढे लिहायला तयार, ना चर्चा करायला तयार, ना विचार विनिमय, ना धोरण, ना दिशा, ना उत्साह, ना व्यवस्थापनांना वेसण घालण्याची सामूहिक ताकद, ना ती उभी करण्याची मानसिक तयारी, ना राज्यकर्त्यांवर दबाव आणण्याची साधनसामुग्री, अशा दयनीय अवस्थेत संवाद-जनसंवाद-पत्रकारिता-माध्यम शिक्षण व शिक्षकांचा आवाज ऐकणार तरी कोण आणि कशासाठी?

कमीत कमी पुण्याला झालेल्या या पहिल्या वहिल्या का होईना पण पत्रकारिता-माध्यम शिक्षक परिषदेमुळे या दिशेने एक पाऊल तरी टाकले गेले आहे. त्याचे मनःपूर्वक स्वागत केले पाहिजे. ते पाऊल बहुजनांचे आहे की अभिजनांचे यापेक्षा महत्त्वाचे आहे ते हे, की माध्यम शिक्षण हे सर्वजनांचे होऊन सर्वजनांना माध्यम शिक्षित करून सोडण्याच्या चळवळीत त्याचे रूपांतर कसे होईल हे बघणे. संकल्प हा त्या दृष्टीने व त्यासाठी हवा.

☆☆☆








# सत्यशोधक चळवळीच्या मार्क्सवादी प्रेरणा

- प्रा. डॉ. विजय पाटील

**सत्यशोधक चळवळीचे योगदान -**

अब्राह्मणी तत्त्वज्ञानाच्या परंपरेचा वारसा सांगणाऱ्या म. फुले यांनी बहुजन समाजाच्या शोषणमुक्तीसाठी ब्राह्मण-शाही विरोधात सत्यशोधक चळवळीच्या माध्यमातून जनआंदोलन उभारले होते. त्यांनी ब्राह्मणशाही विरोधातील बंडाची संपूर्ण विचारसरणी विकसित करून ब्राह्मणेतर चळवळीची पायाभरणी केली. फुलेंनी आपल्या लिखाणातून स्त्रिया, अस्पृश्य आणि शेतकरी या हिंदू समाजव्यवस्थेतील शूद्र, अतिशूद्रांच्या शोषणाचे समग्र आणि विदारक चित्रण केले. शूद्र अतिशूद्रांच्या समस्येचे केवळ विश्लेषण न करता मत्स्यावतारापासून अलीकडच्या रावबहाद्दूरांपर्यंतच्या इतिहासाचा नवा अन्वयार्थ फुलेंनी उलगडून दाखविला.[१] भारतीय इतिहास शोषक ब्राह्मण आणि शोषित अब्राह्मण यांच्या सततच्या संघर्षात विभागलेला आहे, असे फुलेंचे प्रतिपादन होते. हे शोषण थांबविण्यासाठी शूद्रातिशूद्रांनी जागृत व संघटित होऊन आपल्या हक्कांसाठी झगडा केला पाहिजे, अशी फुलेंनाच प्रथम जाणीव झाली. गुलामगिरी, ब्राह्मणांचे कसब, तृतीयरत्न, शेतकऱ्यांचा असूड या ग्रंथातून त्यांनी आपले विचार विश्लेषण करून बळीराज्याची कल्पना मांडली. शेतकऱ्यांचे राज्य हे बळीराज्याच्या रूपकल्पनेत फुलेंनी विशद केले. आपल्या विचारांना व्यवहारात साकार करण्यासाठी त्यांनी १८७३ साली सत्यशोधक समाज ही कृतीशील लोकचळवळ स्थापन केली. महाराष्ट्रातील कनिष्ठ जातींच्या व बहुजन समाजाच्या उद्धारासाठी सुरू करण्यात आलेली पहिली सामाजिक चळवळ म्हणून सत्यशोधक चळवळीचा उल्लेख केला जातो. परंतु, त्या काळातील ब्राह्मोसमाज, प्रार्थनासमाज, परमहंस सभा या समाजसुधारणावादी संघटनेप्रमाणे सत्यशोधक समाजाचे स्वरूप नव्हते तर तत्कालीन काळातील ती एक क्रांतिकारक व समाज-परिवर्तनवादी चळवळ होती.[२] तिचे स्वरूप जरी जातीय भासत असले तरी, ती मूलतः वर्गीय चळवळ होती. परंतु येथल्या जातिव्यवस्थेमुळे तिचे स्वरूप जातीय-वर्गीय बनणे अटळ होते. सामाजिक समतेचा लढा हा मूलतः आणि अंतिमतः वर्गलढ्याशी निगडित आहे. म्हणून शूद्रातिशूद्रांचा उच्च वर्गीयाविरुद्ध असलेला समतेचा, मानवी हक्कांचा लढा जो सत्यशोधक चळवळीने लढविला हा श्रमिक जनतेच्या वर्गीय लढ्याचाच एक अंगभूत भाग आहे.[३] म्हणून मार्क्सवादी परिभाषेत फुलें-प्रणीत सत्यशोधकी चळवळ क्रांतिकारी ठरते.

सत्यशोधक चळवळ ही सर्वस्पर्शी होती. त्यांनी-फुलेंनी शूद्रातिशूद्रांना गुलामगिरीत डांबून ठेवणाऱ्या हिंदू धर्मसमस्येवर आणि सामाजिक परंपरेवर त्वेषाने घाव घातले. त्याबरोबरच त्यांनी कष्टकरी समाजाच्या आर्थिक प्रश्नांचाही तत्परतेने पाठपुरावा केला.[४] १८७४, ७५ साली दक्षिण महाराष्ट्रातील शेतकऱ्यांनी खोतीदार-जमिन-दार व सावकारांविरुद्ध उत्स्फूर्त बंड केले, त्याला तात्त्विक अधिष्ठान देण्याचे कार्य जोतिराव फुलेंच्या सत्यशोधक समाजाने केले. शेतकऱ्यांप्रमाणेच कामगार वर्गातही सत्यशोधक समाजाचे कार्य होते. फुलेंचे सहकारी व सत्यशोधकी नेते दीनबंधूकार नारायण मेघाजी लोखंडे यांनी मुंबईच्या कामगारांना संघटित करून १८८४ साली गिरणी मजूर संघाची 'मिल हॅण्डस असोसिएशन' स्थापना केली. जी भारतातील पहिली कामगार संघटना होती. लोखंडे यांनी कामगारांचे लढे ब्राह्मणेतरांचे लढे म्हणून लढविले.

१८७३ ते १८८० या कालखंडात सत्यशोधक चळ-वळीचे नेतृत्व स्वतः फुलेंनी केले. या काळात बहुजन जातीमध्ये सत्यशोधकी विचारांचा कृतीशील प्रसार झाला. भारतीय जातिव्यवस्थाविरोधी लढ्याला निश्चित दिशा मिळाली. बहुजन समाजाच्या जिव्हाळ्याच्या सामाजिक व आर्थिक प्रश्नांचा फुले व भालेकरांसारख्या सहकाऱ्यांनी आत्मीयतेने परामर्श घेऊन खालच्या थरातील लोकांना जागृत व संघटित करण्याचा प्रयत्न केला. परंतु स्वातंत्र्य

अनुक्रमणिका

चळवळीपासून ही चळवळ मात्र दूर राहिली. केवळ शेटजी, भटजी विरोधातच त्यांचे संघर्ष मर्यादित राहिले.

**छत्रपती शाहू महाराजांचा पाठिंबा :**

फुलेंच्या मृत्यूनंतर सत्यशोधक चळवळीचा वेग मंदावला. परंतु १९११ नंतर कोल्हापूरच्या छत्रपती शाहू महाराजांच्या सक्रिय पाठिंब्यानंतर मात्र तिला पुन्हा वेग आला. महाराजांना आपल्या घरचे धर्मविधी वेदोक्त मंत्रांनी करण्याचा अधिकार आहे की नाही? या प्रश्नावरून वेदोक्त प्रकरण गाजले. त्यामुळे हिंदू समाजातील धार्मिक विषमता, ब्राह्मणी वर्चस्व, अन्याय याची जाणीव महाराजांना झाली. म्हणून शाहू महाराजांनी बहुजन व अस्पृश्य जातीजमातीच्या विकासाची पाऊले उचलली. त्यांच्यासाठी शिक्षणव्यवस्था, राखीव जागा निर्माण केल्या. ब्राह्मणीव्यवस्थेला धक्का देण्यासाठी सत्यशोधक चळवळीला पाठिंब्याचे धोरण त्यांनी अंगिकारल्याने तिला जनआंदोलनाचे रूप आले. मुकुंदराव पाटील, भास्करराव जाधव, कर्मवीर वि. रा. शिंदे, अण्णासाहेब लठ्ठे, कर्मवीर भाऊराव पाटील, केशवराव जाधव, माधवराव बागल, दिनकरराव जवळकर या सत्यशोधकी ब्राह्मणेतर नेतृत्वाची फळी त्यामुळे पुढे आली. १९१८-२० या दरम्यान मद्रास प्रांतातील रामस्वामी नायकरांच्या स्वाभिमानी चळवळीपासून व जस्टीस पार्टीकडून प्रेरणा घेऊन ब्राह्मणेतर चळवळ उभी राहिली. सत्यशोधक समाजाचे बहुतांश नेते ब्राह्मणेतर चळवळीत आले. शाहू महाराजांच्या निर्णायक महत्त्वाच्या आश्रयाने ब्राह्मणेतर चळवळ १९२० पासून प्रबळ बनत गेली.[५] सत्यशोधक व ब्राह्मणेतर चळवळ महाराष्ट्राच्या ग्रामीण भागात प्रभावीपणे पसरली. कारण जातिव्यवस्थेचे सामंतप्रथाक संबंध ग्रामीण भागात बलवत्तर होते. त्यामुळे जमीनदारशाही विरोधी व जातिव्यवस्थाविरोधी मराठी परिभाषेत शेठजी-भटजी विरोधी आंदोलने शूद्र शेतकरी जातींच्या चळवळी म्हणून उफाळली.[६] या चळवळींनी ब्राह्मणी वर्चस्वाला धक्का देण्यासाठी ग्रामीण भागात बहुसंख्य असलेल्या मराठी, माळी, लिंगायत, धनगर, जैन या मध्यम शेतकरी जाती व अस्पृश्य जातींना संघटित करण्याचा प्रयत्न केला. विविध जाती परिषदांचे आयोजन केले. सत्यशोधक विवाह, मेळे, जलशे, तमाशे, जाहीर सभा, विजयी मराठा, राष्ट्रवीर व दिनमित्र या वृत्तपत्रांच्या माध्यमातून त्यांनी प्रबोधनाचे व प्रचाराचे कार्य केले. १९११ ते १९२१ या कालखंडात सत्यशोधक जलशांच्या सावकारशाही आणि ब्राह्मणशाही विरोधातील प्रबोधनाने सातारा जिल्ह्यात शेतकऱ्यांनी सावकारशाही आणि ब्राह्मणशाही विरुद्ध बंड केले. १९११च्या एप्रिलपासून दोन वर्षांपर्यंत सत्यशोधक चळवळीच्या संगतीने उभे राहिलेले अराजकी पद्धतीने चालू राहिलेले ते एक बंड होते.[७]

**सत्यशोधकाचे शेतकरी उठाव :**

ग्रामीण भागातील खंडकरी व सावकारशाहीविरोधात सत्यशोधक व ब्राह्मणेतरांनी शेठजी-भटजी विरोधी शेतकरी आंदोलने उभी केली. रयतवारी पद्धतीमुळे महाराष्ट्रात मारवाडी, गुजर व ब्राह्मण सावकारशाही व ब्राह्मण व खंडकरी खोतीदार - इनामदार विरुद्ध कर्जबाजारी कंगाल शेतकरी कूळ जातीवर्ग असा अंतर्विरोध उदयाला आला. त्यामुळे ब्राह्मणेतर सत्यशोधकांना शेतकरी जातवर्गात पाया मिळाला. १९२० साली सातारा जिल्ह्यातील जमीनदारी खंडपद्धती विरोधी शेतकरी बंडाचे नेतृत्व ब्राह्मणेतर चळवळीने केले. या बंडात जमीनदारांचा खंड ३/४ व २/३ ऐवजी निम्मा १/२ व्हावा अशी मागणी होती. १९२७, २८ पर्यंत तुकडेबंदी बिलाविरुद्ध (स्मॉल होल्डिंग्ज बिलाविरुद्ध) ब्राह्मणेतरांनी आंदोलन करून १९२८ साली महाराष्ट्रात पहिली शेतकरी वर्गाची संघटना स्थापन केली. ब्राह्मणेतर नेते भास्कर जाधव यांनी तुकडे बिलाला विरोध करताना कमाल जमीनसुधारणा कायदा करून गैरहजर जमीनदारी नष्ट करायची मागणी केली. १९३४ मध्ये बुलढाणा जिल्ह्यात चिखली व मेहकर तालुक्यात सत्यशोधक नेते आनंदस्वामींनी शेटजी, भटजी विरोधात उग्र शेतकरी आंदोलन केले होते.[८] अशाप्रकारे ब्राह्मणशाही विरोधात संघर्ष करणाऱ्या सत्यशोधक व ब्राह्मणेतर चळवळीला आर्थिक लढ्याचेही परिमाण होते. मार्क्सवादासारखी शास्त्रीय वर्गलढ्याच्या तत्त्वज्ञानाची दृष्टी नसल्याने शोषणाविरुद्ध लढण्याचे हत्यार जातीय संघटना होत्या. तरीही ब्राह्मण सरंजामदार व सावकाराविरुद्ध शूद्रजातीचे शेतकरी शोषणाविरुद्ध उठले हे लक्षणीय आहे. ही वस्तुस्थिती सत्यशोधक व ब्राह्मणेतर चळवळीला कम्युनिस्ट चळवळीच्या जवळ नेणारी होती. ब्राह्मणेतर पक्षातील

अनुक्रमणिका






जहालप्रवाह, जेधे–जवळकरांच्या नेतृत्वाखाली शेटजी-भटजी विरोधी मोठमोठे शेतकरी लढे लढवून लढ्याकडे वाटचाल करीत होता.

**मुंबईतील कम्युनिस्टांचा दुरावा :**

या संपकाळातच महाराष्ट्रातील मुंबई, पुणे, नागपूर, सोलापूर या भागामध्ये कम्युनिस्टांचे कामगार चळवळीमध्ये बस्तान बसले होते. त्यांनी कामगार किसान पार्टी काढून शेतकरी चळवळीमध्ये शिरकाव करण्याचा प्रयत्न केला तरी कम्युनिस्टांना कामगारामध्येच पाया मिळाला. महाराष्ट्रातील ग्रामीण भागात व शेतकऱ्यांमध्ये सत्यशोधक व ब्राह्मणेतरांचे कार्य असल्याने कम्युनिस्टांनी जाती-संस्कृतीचे, ब्राह्मण-ब्राह्मणेतरांतील अडथळे मोडून ब्राह्मणेतरातील उद्योन्मुख जहाल व लढाऊ पुढाऱ्यांपैकी काहींना आपल्याकडे वळवून घेतले असते तर महाराष्ट्रातील अत्यंत जोरदार शेतकरी चळवळीमध्ये भारतातील कम्युनिस्ट ताकदीचा पाया फार मोठ्या प्रमाणात वाढला असता. यामुळे महाराष्ट्रातील कम्युनिस्टांच्या नेतृत्वाखालील कामगारवर्गाला ब्राह्मणेतर पक्षाच्या नेतृत्वाखालील शेतकरी वर्ग दोस्त म्हणून मिळवता आला असता. प्रत्यक्षात मात्र कम्युनिस्टांचे व ब्राह्मणेतरांचे संबंध वितुष्टांचे राहिले. साताराच्या शेतकरी बंडाच्या पार्श्वभूमीवर कम्युनिस्ट नेते श्री. अ. डांगे यांनी आपल्या सोशालिस्टमध्ये २५.११.१९२२ रोजी लेख लिहून साताराच्या ब्राह्मणांनी सावकार जमीनदार सशस्त्र लिग स्थापन करण्याचे आवाहन करून शेतकरी बंडाला प्रतिकूल भूमिका घेतली. ब्राह्मणेतर चळवळ सरकारजमा व स्वार्थी, संधीसाधू जातीयवादी अशी संभावना डांगेंनी करून, ब्राह्मणेतर चळवळ म्हणजे एक मोठे थोतांड आहे, या चळवळीची भूमिका एकदम संकुचित आहे. तिचे अधिष्ठान जातीयद्वेष आहे. या चळवळीला आर्थिक पाया असा काहीच नाही असे मत व्यक्त केले. तर भास्करराव जाधव, गोविंदराव शिंदे सारखे ब्राह्मणेतर नेते कम्युनिस्टांवर ब्राह्मणी नेतृत्व अशी टिका करून कम्युनिस्टप्रणीत कामगार संघटनामध्ये फूट पाडण्याच्या कारवाया करीत होते. दिनकरराव जवळकरही प्रारंभीच्या काळात 'कैवारी'मध्ये लेख लिहून कम्युनिस्टांतील ब्राह्मणी नेतृत्वावर हल्ला करीत असत. वास्तविक शोषणमुक्तीसाठी लढणाऱ्या कम्युनिस्ट व ब्राह्मणेतर चळवळीमध्ये समान ऐक्याचा धागा असतानाही त्या एकमेकापासून फटकून राहिल्या.

ब्राह्मणेतर व सत्यशोधक चळवळीचे प्रेरणास्तोत्र महात्मा फुले व त्यांचे तत्त्वज्ञान होते तर कम्युनिस्टांनी विशेषतः डांगे यांनी आपल्या प्रेरणांचे श्रेय लो. टिळकांना दिले भारतीय कम्युनिस्ट चळवळीची जर सर्वात गंभीर चूक कोणती झाली असेल तर ती म्हणजे भारतीय इतिहासातील कोणत्या नेत्यापासून प्रेरणा स्वीकाराव्यात याबद्दल कम्युनिस्टांची झालेली गफलत. विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात भारतात कम्युनिस्ट चळवळ म्हणून जी एक पुरोगामी चळवळ उदयाला आली असे मानले जाते; त्या चळवळीने आपल्या प्रेरणांचा नीट विचारच केला नाही. म. जोतिराव फुल्यांच्या आणि कार्ल मार्क्सच्या प्रेरणा एकच की भिन्न या वादात रस घेणाऱ्या कम्युनिस्ट पुढाऱ्यांनी मात्र हिंदू महासभेसारख्या जातीयवादी संघटनेला जन्म देणारे विचार मांडणाऱ्या लो. टिळकांपासून प्रेरणा स्वीकारल्या. त्यामुळे लो. टिळकांना देशाचे दुष्मन या रूपात बघणारे ब्राह्मणेतर बिथरणे स्वाभाविक होते. कम्युनिस्टांनी भांडवलशाही व सरंजामशाहीच्या विरोधात संघर्ष करताना साम्राज्यशाहीशी संघर्ष केला. भारतीय स्वातंत्र्य हा कम्युनिस्ट क्रांतीचा पहिला टप्पा होता. याउलट ब्राह्मणेतर नेतृत्वाने ब्रिटिश साम्राज्यशाही व सायमन समर्थनाची भूमिका घेतली होती. ह्या परस्पर विरोधी भूमिका महाराष्ट्रातील कम्युनिस्ट व ब्राह्मणेतरांना जवळ आणण्यात अडसर ठरल्या. ब्राह्मणेतरांनी ब्रिटिशधार्जिणी भूमिका घेतली असली तरी, म. गांधींनी ४ सप्टेंबर १९२४ रोजी पुण्याला जेधे मॅन्शनला भेट दिल्यानंतर, 'ब्राह्मणेतरांनी आत्मबलावर आपली उन्नती करून घ्यावी' असा त्यांना सल्ला दिला. परक्या राज्यकर्त्यांवर ब्राह्मणेतरांनी अवलंबून राहू नये असा गांधीजींच्या उपदेशाचा अर्थ होता हे केशवरावांसारख्या तरुणांना समजल्याशिवाय राहिले नाही.[११] त्यामुळे काँग्रेसच्या राष्ट्रवादी राजकारणाकडे व स्वातंत्र्य चळवळीच्या प्रवाहाकडे जेधे गटांचा प्रवास सुरू झाला. गांधीयुगात काँग्रेसच्या अखिल भारतीय पातळीवरील पक्षसंघटनेत ब्राह्मणांचा वरचष्मा कमी झालेला असला तरी महाराष्ट्रातील काँग्रेसवर टिळकपक्षीय ब्राह्मणांचेच वर्चस्व होते. म्हणून गांधीभेटीतच ब्राह्मणेतर प्रवाह काँग्रेसमध्ये

सहभागी झाला नाही. पण काँग्रेसचे नव्या डाव्या राष्ट्रवादी नेतृत्वाचे प्रतिनिधी न. वि. गाडगीळ यांनी ब्राह्मणेतर चळवळीच्या नव्या डाव्या नेतृत्वांशी जेधे-जवळकरांशी संबंध जोडले. त्यातून १९३० साली केशवराव जेधेंच्या नेतृत्वाखालील ब्राह्मणेतर शेतकरी चळवळ काँग्रेसमध्ये सहभागी झाली. ब्राह्मणेतर चळवळ ज्याप्रमाणे सामाजिक व धार्मिक प्रगतीसाठी अस्तित्वात आली आहे त्याप्रमाणे राजकीय बाबतीतसुद्धा तिने तितक्याच जोराने पुढाकार घेतला पाहिजे. राजकीय चळवळी राजकीयबाबतीत तेवढा पुढाकार घेतात, पण सामाजिक व राजकीय बाबतीत यांचा पाय मागे असतो. 'म. गांधी हे तिन्ही बाबतीत पुढे असल्यामुळे मी त्यांचे शिष्यत्व पत्करून कायदेभंगाच्या चळवळीत सामील झालो."[१२] असे पत्रक काढून केशवराव जेधेंनी राजकारण व समाजकारण हे जोडीने गेल्याशिवाय राष्ट्राचा गाडा चालणार नाही अशी भूमिका घेतली. म्हणजे कम्युनिस्टांनी काँग्रेसप्रमाणे पुढाकार घेऊन ब्राह्मणेतरांना स्वतःकडे वळविण्याचा प्रयत्न केले असते तर हा प्रवाह त्यांच्याकडे वळाला असता. सेलिंग हॅरिसन यांच्या प्रतिपादनानुसार जेधे प्रादेशिक राष्ट्रवादाचा उपयोग कम्युनिस्टांनी करून घेतला तेथे ते यशस्वी ठरले आणि व्यापक ब्राह्मणेतर जातीच्या प्रचारकांवर स्वतःला आधारले.[१३] केरळ, आंध्र याचे उदाहरणे आहेत. केरळात नंबुद्री ब्राह्मण एळवा या मध्यम जातीला अस्पृश्य तर राजेशाही परंपरा असलेल्या नायर जातीला शूद्र मानीत असे. एळवांनी एसएनडीपी श्री. नारायण गुरु परिपालन ही ब्राह्मणेतर चळवळ सुरू करून एक देव, एक जात, एक धर्म अशी घोषणा दिली. एळवा मध्यम व गरीब शेतकरी आणि शेतकरी कुळे असलेले नायर यांना शेतकरी आंदोलनात रस होता. गांधीजींच्या कायदेभंग चळवळीतील माघारीमुळे निराश होऊन ते प्रथम काँग्रेस समाजवादी पक्ष व नंतर ते कम्युनिस्ट चळवळीकडे आकर्षित झाले. कम्युनिस्टांनी केरळात बहुजातीय जहाल पुढारीपणाने शेतकरी लढे संघटित केले. त्यामुळे कुळे व शेतमजूर यांची एकजूट झाली आणि जातीय सुधारणा आणि सांस्कृतिक संघटना यातील भागीदारीमुळे त्यांत सांस्कृतिक जहालपणाही अंतर्भूत झाला. एळवा आणि नायरामध्ये कम्युनिस्टांनी पाया मिळवल्याने त्यांची वाढ होऊ शकली. केरळात एसएनडीपी ही ब्राह्मणेतर शेतकरी चळवळ कम्युनिस्ट चळवळीत समाविष्ट झाली कारण तिच्या प्रवर्तकात ए. के. गोपालनसारख्या ब्राह्मणेतर नेत्याचे प्राधान्य होते. शिवाय ब्राह्मणेतर चळवळीचा समन्वय करण्यात ई. एम. एस. नंबुद्रीपादांनी तेवढाच पुढाकार घेतला.[१४] केरळप्रमाणेच आंध्रातील कम्युनिस्ट पुढाऱ्यांमध्ये काही ब्राह्मण पुढारी होते. परंतु ब्राह्मणेतरांची बहुसंख्या होती. कम्मा जातीमध्ये कम्युनिस्टांनी स्वतःला सामाजिक पाया मिळविला होता. शिवाय पी. सुंदरैय्या आणि राजेश्वररावसारखे रेड्डी जातीचे ब्राह्मणेतर नेते कम्युनिस्ट झाले होते. आंध्रातील पुढारी ब्राह्मणेतर चळवळीतून आणि संस्थातून आले होते. त्यांनी जमिनदारी सत्तेविरुद्ध शेतकरी चळवळी संघटित केल्या, प्रामुख्याने अस्पृश्य शेतमजुरांमध्ये सुरुवातीच्या काळात पाया तयार केला. परंतु नंतर आंध्रातील कम्युनिझम सधन शेतकऱ्यांचा कम्युनिझम झाल्याने हा पाया विस्कळीत होऊन गेला. कम्युनिस्टांनी भाषिक राष्ट्रीय मागण्या जोरदारपणे घेऊन संयुक्त तेलगू राज्याची मागणी पुढे आणली आणि आंध्र महासभेच्या सहाय्याने तेलंगणात कम्युनिस्टांनी प्रवेश केला. रेड्डी जातीची होस्टेल संघटना उभारण्याची केंद्रे म्हणून उपयोगी पडली. या सर्वांचा परिणाम म्हणजे विसाव्या शतकातील भारतातील सर्वात मोठा कम्युनिस्ट शेतकरी उठाव तेलंगणात झाला. अशाप्रकारे भारतीय कम्युनिस्टांचा उदय प्रत्येक प्रांतात साम्राज्यविरोधी संघर्षातून झाला असला तरी जेथे जेथे काँग्रेसमधील डावे प्रवाह, जातीविरोधी चळवळी, शेतकरी उठाव यांच्याशी त्यांनी स्वतःला जोडून घेतले, तेथे त्यांचा पाया विस्तृत झाला. कम्युनिस्टाचा दूर दृष्टिकोण आणि ब्राह्मणेतर जातीविरोधी चळवळीतील पुरोगामीपणा यांचा योग्य समन्वय कम्युनिस्टांना व्यापक करीत गेला. महाराष्ट्रात मात्र केरळ व आंध्राचा प्रयोग झाला नाही. सत्यशोधक व ब्राह्मणेतर चळवळीत दिनकरराव जवळकर, केशवराव जेधे यांच्यासारखे, डावे जहाल प्रवाह असतानाही महाराष्ट्रातील कम्युनिस्टांनी दूरदृष्टी दाखवून ब्राह्मणेतर चळवळीशी समन्वय करण्याचा प्रयत्न केला नाही. परिणामी कम्युनिस्टांना महाराष्ट्रातील ग्रामीण भागात पाया मिळाला नाही. महाराष्ट्रात ब्राह्मणेतर चळवळीशी व आंबेडकरांच्या






दलित चळवळीशी त्यांचा संबंध तुटल्यामुळे मराठा व महार या प्रभावशाली जातींमध्ये कम्युनिस्टांना शिरकाव करता आला नाही.

**बागलांचा सत्यशोधकांना इशारा :**

१९२८ ते १९३२ या कालखंडाच्या दरम्यान सत्यशोधक चळवळीतील नव्या दमाच्या तरुण पिढींमध्ये सत्यशोधक चळवळीने केवळ सांस्कृतिक संघर्षापुरते मर्यादित न राहता अधिक व्यापक भूमिका घेवून जनसंघर्षाचे लढे लढविले पाहिजे असे विचार बळावू लागले. त्यापैकी माधवराव बागल यांनी १९३० मध्ये 'सत्यशोधकांना इषारा अर्थात नव्या पिढीचे राजकारण' हे पुस्तक लिहून वरील भूमिकेचे सूतोवाच केले. जगभर पसरलेल्या भांडवलशाहीमुळे विषमतेला स्थायिकत्व प्राप्त झाले असून, गुलामगिरीने नवे रूप धारण केले आहे. ही गुलामगिरी दर्शनी भयानक दिसत नाही, पण तिचा परिणाम मात्र फारच भयानक आहे. या भांडवलशाहीमध्ये भांडवलदार व कामगार या वर्गामध्ये तीव्र संघर्ष चालला असून, त्यापैकी रशियातील कामगारांनी भांडवलदारांच्या हातातून सत्ता हिसकावून तेथे श्रमिकांची समतावादी सत्ता प्रस्थापित करण्याचा प्रारंभ केला आहे. अशाप्रकारे संपूर्ण जगभर कामगार-श्रमिकांची समतावादी चळवळ सुरू झाली आहे. अशा या जगातील समतावादी चळवळीत सत्यसमाजालाही भाग घ्यावयाचा आहे. म्हणून सत्यशोधकांनी यापुढे आपल्याला धार्मिक चळवळीपुरतेच राहण्याचे धोरण सोडून द्यावे. आणि समतेचे ध्येय असणाऱ्या सोशियालिस्ट पक्षाच्या दिशेने वाटचाल करावी असे आवाहन बागल यांनी केले. भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर येणारी सत्ता ब्राह्मण जातीच्या पांढरपेशा मध्यमवर्गीय व भांडवलदार वर्गाच्या हातात जाऊन जातिव्यवस्था व वर्गव्यवस्था यांचे जोखड भारतातील शेतकरी, शेतमजूर, कामगार, स्त्रिया, अस्पृश्य या सर्वहारांच्या खांद्यावर लादले जाऊन गुलामगिरीच्या शृंखलेत पुन्हा त्यांना बंदिस्त केले जाईल असा इशारा बागल यांनी सत्यशोधक चळवळीतील नव्या पिढीला दिला होता. म्हणून सत्यशोधकांनी स्वातंत्र्याच्या चळवळीत सहभागी होऊन स्वराज्य मिळवावे, त्यानंतर समतावादी सत्यशोधकाने राजकीय सत्ता आपल्या हाती घेण्याच्या प्रयत्नास लागले पाहिजे. शेतकरी, मजूर व अस्पृश्य वर्गात जागृती उत्पन्न करून राज्यकारभारात त्यांचे वजन पडेल, त्यांना भाग घेता येईल अशी परिस्थिती निर्माण केली पाहिजे.[१५] असे बागल यांनी स्पष्ट करून सत्यशोधक चळवळीला वर्गीय प्रतिमान देण्याचा प्रयत्न केला. बागलांनी सत्यशोधक चळवळीला समाजवादाच्या दिशेने जाण्यासाठी लिहिलेले हे पुस्तक सत्यशोधक व कम्युनिस्ट पक्षांना एकत्र आणण्याची संधी निर्माण करणारे होते. या पुस्तकाला प्रस्तावना लिहिणारे वि. रा. शिंदे यांनी बागलाच्या भूमिकेचे स्वागत करून ब्राह्मणेतरांनी शेतकरी व कामगारांचे वर्गीय लढे लढविण्याची भूमिका प्रतिपादन केली होती. ब्रिटिशांच्या आगमनानंतर भारतात उदयास आलेल्या नव्या वर्गीय स्थित्यंतराचे भान आलेल्या शिंदेंनी शेतकरी व कामगार संघ बांधले जावेत असे आग्रहाने प्रतिपादले. वसाहत काळामध्ये जाती वर्गग्रस्त व वर्ग जातीग्रस्त होत असल्याची प्रक्रिया सुरू झाल्याचे वि. रा. शिंदे यांना स्पष्ट जाणवले होते.[१६] १९२८ साली अस्पृश्य शेतकरी परिषद आणि मुंबई इलाखा शेतकरी परिषद शिंदेंनी आयोजित केली होती. तसेच १९३१ साली बोरगाव येथे वाळवे तालुका शेतकरी परिषद, १९३२ साली तेरदाळ येथे संस्थांनी शेतकरी परिषद व वडनेर नाशिक येथे चांदवड तालुका शेतकरी परिषद शिंदेनी संघटित केल्या होत्या. शिंदेंनी शेतकऱ्यांच्या समस्यांचे वस्तुनिष्ठ विवरण करून त्यावर उपाययोजना सुचविल्या होत्या. शहरांतील गिरणी कामगार हा मूलतः विस्थापित शेतकरी असून त्यांच्या संघटना व शेतकऱ्यांच्या संघटना एकत्रित जोडल्या पाहिजे. अशी शिंदेंची अपेक्षा होती. म्हणजे कामगार व शेतकरी वर्गशक्ती एकत्र करून वर्ग व जातीचे प्रश्न एकत्रितपणे सोडविण्याचे प्रतिपादन शिंदेनी केले. त्यामुळे कम्युनिस्ट पक्ष व ब्राह्मणेतर चळवळीतील दलित शेतकरी जातिवर्ग यांच्यात पूल निर्माण होण्याची संधी तयार होत होती. शिंदेंच्या प्रेरणेने केशवराव जेधे, दिनकरराव जवळकर, कर्मवीर भाऊराव पाटील हे ब्राह्मणेतर चळवळीतील जहाल नेत्यांनी शेतकरी सत्याग्रहात सहभाग घेतला होता. एकंदरीत या कालखंडात सत्यशोधक व ब्राह्मणेतर चळवळीतील नव्या उमेदीची तरुण पिढी, सत्यशोधक चळवळीला नवी करवट देऊन समाजवादी विचारांच्या दिशेने








मार्गक्रमण करीत होताना दिसते.

**ब्राह्मणेतरातील कम्युनिस्ट आकर्षण :**

ब्राह्मणेतर चळवळीत केशवराव जेधे आणि दिनकरराव जवळकर यांचे प्रभावी नेतृत्व होते. जेधे जवळकरांनी सत्यशोधकी चळवळीला आक्रमक व लढावू बनविले. १९२७ नंतर ज्यामुळे महाराष्ट्रीय सनातनी ब्राह्मणांचे वर्चस्व कमी होईल असे सामाजिक सुधारणावादी पर्याय गाडगीळांनी काँग्रेसकडून दिल्याने, महाराष्ट्रातील ब्राह्मणेतरांचा कल काँग्रेसकडे वाढला. दिनकरराव जवळकरांना मात्र कम्युनिस्ट चळवळीचे आकर्षण होते. त्यांचा ब्राह्मणी कम्युनिस्ट नेतृत्वाला जरी विरोध असला तरी त्यांचा एस. एस. मिरजकर या ब्राह्मणेतर कम्युनिस्ट नेतृत्वांशी संबंध प्रस्थापित झाला होता. या संबंधातून जवळकर हे मार्क्सवादी बनून पुढे आले. ब्रिटिश कम्युनिस्ट पक्षांशी त्यांचा जवळून संबंध आला. इंग्लंडहून परत आले ते मार्क्सवादाची शिकवण घेऊनच.[१७] 'क्रांतीचे रणशिंग' हे पुस्तक लिहून ऐतिहासिक भौतिकवाद, भारतीय इतिहास व समाजाला लावायचा प्रयास जवळकरांनी केला. जातीय परिभाषेतील फुलेंची शेतकरी समाजवादाची कल्पना जवळकरांनी जातीयवर्गीय परिभाषेत मांडून, ती शेतकऱ्यांच्या स्वतंत्र संघटनेने, सैन्याने व उठावाने सिद्धीला जाईल असे प्रतिपादन केले. मार्क्सवाद आणि फुलेवादाच्या प्रभावातून 'क्रांतीचे रणशिंग' या पुस्तिकेत 'सोशियालिझम - समाज सत्तावाद' हे प्रकरण जवळकरांनी लिहिले. त्यानुसार देशातील शेतकरी, कामगार, अस्पृश्य, स्त्रिया यांच्या समतेवर उभा असलेला आणि परान्नपुष्ट भांडवलदार, वतनदार, धर्ममार्तंड यांना नाकारणारा समाजसत्तावाद जवळकरांनी प्रतिपादन केला. जवळकरांमध्ये तयार झालेली जास्त जहालउर्मी त्यांच्या शेटजी, भटजी, लाटजी विरोधी म्हणजे जातिलढा व साम्राज्यशाहीविरोधी लढा यापर्यंत वाढत गेला. शेतकऱ्यांचे लढे मार्क्सवादी तत्त्वज्ञानाच्या आधारे लढविण्याची त्यांची मनिषा कम्युनिस्टांना शेतकऱ्यांमध्ये पाया प्राप्त होण्याची संधी तयार करीत होती. फुलेवाद हा शास्त्रीय मार्क्सवादाशी जोडण्याचा पहिला ऐतिहासिक प्रयत्न जवळकरांनी केला होता. जवळकर सत्यशोधक चळवळ मार्क्सवादी चळवळीत समाविष्ट करावी लागेल असे प्रतिपादन करत आणि त्यायोगे वर्गलढा आणि सामाजिक लढाऊपणा टिकवून धरण्याचा प्रयत्न करीत होते. परंतु त्यांच्या अकाली निधनामुळे सत्यशोधक व कम्युनिस्ट यांच्यातील दुवा मजबूत होण्याची शक्यता मावळत गेली. एकंदर ब्राह्मणेतर व सत्यशोधक चळवळीची भूमिका जातिलढा व वर्गलढा संयुक्तपणे लढविण्याची व त्यामार्गे क्रांती घडवून आणण्याची नव्हती हे खरे. पण त्या चळवळीतील जवळकरांसारखे पुढाकारलेले घटक भटशाही व भांडवलशाही यांच्याविरुद्ध लढा करण्याची भूमिका घेत होते. शेटजी, भटजी व लाटजी हे शत्रू मानून जातिसंस्था, वर्गसंस्था व साम्राज्यशाही या तिन्ही विरुद्ध एकत्रित लढा लढविण्याचे सूत्र मांडीत होते. परंतु कम्युनिस्टांना हे सूत्र उचलता आले नाही.

**संदर्भ :**


१. **महात्मा फुले आणि त्यांची परंपरा,** लोकवाङ्मय-गृह प्रा. लि. मुंबई, १९८२, पृष्ठ २१४.

२. **महात्मा फुले, व्यक्ती आणि विचार,** सरदार गं. बा.- ग्रंथाली, मुंबई १९८२, द्वि. आ. पृष्ठ १७८.

३. **वासाहतिक समाजातील सांस्कृतिक बंड -** ऑमव्हेट गेल, भाषांतर पी. डी. दिघे, सुगावा प्रकाशन, पुणे १९९५, पृष्ठ १२१.

४. **रणदिवेंचा ब्राह्मणेतर चळवळीच्या आकलनाचा सनातनी मार्क्सवादी प्रयत्न,** पाटील शरद, सत्यशोधक मार्क्सवादी वः १ अंः ५ जुलै १९८२ पृष्ठ ३०.

५. ऑमव्हेट, पूर्वोक्त पृष्ठ २२३ ते २२६.

६. पाटील शरद, पूर्वोक्त, पृष्ठ २८.

७. फडके य. दि., - **विसाव्या शतकातील महाराष्ट्र,** श्री विद्या प्रकाशन, पुणे, १९८९, पृष्ठ २६६.

८. ऑमव्हेट : पूर्वोक्त पृष्ठ ३२०.

९. डांगे. एस. ए., - **सिलेक्टेड रायटिंग्ज,** खंड १, पृष्ठ २१२ प्रकाशन स्थळ, वर्ष उपलब्ध नाही.

१०. कसबे रावसाहेब, - **महात्मा जोतिराव फुले - सामाजिक क्रांतीचे प्रणेते,** महात्मा फुले गौरव ग्रंथ, महाराष्ट्र राज्य शिक्षण विभाग, मुंबई १९८२, पृष्ठ १६४, १६५.

११. फडके य. दि, - केशवराव जेधे, श्री विद्या प्रकाशन,









पुणे १९८९, ९१, ९२.
१२. पाटील शरद, पूर्वोक्त, पृष्ठ २९.
१३. ऑमव्हेट, पृष्ठ ३२८ ते ३३४.
१४. रणदिवे बी. टी., - **जाति और वर्ग,** नॅशनल बुक सेंटर, नई दिल्ली १९९३, पृष्ठ ६५, ६६.
१५. बागल माधवराव, - **सत्यशोधकांना इशारा,** विजयी मराठा, पुणे १९३१, पृष्ठ १०-११.
१६. कदम शंकरराव, - **म. वि. रा. शिंदे, साहित्य व कार्य,** स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद २०००, पृष्ठ १८९.
१७. ऑमव्हेट, उक्त पृष्ठ २९३.

☆☆☆

---

# गांधीविचार आणि २१ व्या शतकाची आव्हाने

– प्रा. डॉ. एच. व्ही. देशपांडे

"इतिहास नेहमी नवे प्रश्न निर्माण करून जुन्या प्रश्नांची उत्तरे देतो," असे कार्ल मार्क्सने म्हटलेले आहे. भारतीय स्वातंत्र्यसंग्रामाच्या इतिहासाच्या संदर्भात टिळकयुग आणि गांधीयुग यांचा विचार येतो तो पुढे नेहरू युगापर्यंत जोडावा लागतो.

२ ऑक्टोबर ९४चे दरम्यान दै. लोकसत्तेमध्ये माधव गडकरी आणि ग. प्र. प्रधान या दोन मान्यवरांचे लेख प्रसिद्ध झालेले आहेत. म. गांधीजींच्या १२५व्या जयंती संदर्भात गडकरी म्हणतात, "नेते राजघाटावर जातील, 'ईश्वर अल्ला तेरे नाम' अशी प्रार्थना करतील. गांधींच्या मार्गाने जाण्यास देशाला सांगतील, ते स्वतः त्या मार्गाने जाण्याची शक्यता उरलेली नाही." .... मार्क्सचे लाल जगातील दुसरे निधन तसे गांधीजींचे दुसरे म्हणजे वैचारिक निधन जाणवते. "एका बंद गोठलेल्या वाटेचा १२५ वा वाढदिवस गांधीजींच्या स्मरणाने साजरा करू या." हा विचार अधिक स्पष्ट करताना ते म्हणतात, "तीन वर्षापूर्वी गांधी-नेहरूंच्या विचारांना काँग्रेसने तिलांजली दिली आणि गॅट करारावर सही केली. ४४ वर्षांत ना धड भांडवलशाही ना धड समाजवाद. मनमोहन सिंगानी गांधी जयंती साजरी करणे म्हणजे थट्टा आहे." गडकऱ्यांचे हे सर्वच विचार सर्वांनाच मान्य होतील असे म्हणता येणार नाही, तथापि गांधीजींच्या विचारांची आजच्या बदललेल्या परिस्थितीत काय अवस्था झालेली आहे याचे दिग्दर्शन त्यांनी मार्मिकपणे केलेले आहे. त्यांच्या एकूण या लेखातील महत्त्वाचा विचार म्हणजे "शिक्षण आणि सत्ता या संदर्भातील गांधीजींची धोरणे सरकारने का सोडली याचा खुलासा या वर्षात अपेक्षित आहे" असा आहे.

प्रा. ग. प्र. प्रधान यांनी गांधीजींच्या विचारांचा परामर्ष त्यांच्या नेहरू, विनोबा व जयप्रकाश या तीन अनुयायांच्या संदर्भात केलेला आहे. नेहरू बुद्धीवादी तर गांधीजी अंतःप्रेरणेवर (आतला आवाज़) अवलंबून असत. म्हणूनच नेहरू वैज्ञानिकदृष्टीचे होते. तर गांधीजी प्रार्थनेद्वारे आत्मशुद्धीच्या विचाराने जाणारे होते. पंडितजींच्या यंत्राला महात्माजींचा पूर्ण पाठिंबा नव्हता. आपल्या प्रत्येक कार्याला ईश्वरी अधिष्ठान हवे, असा महात्माजींचा आग्रह होता. एका अर्थी "स्वराज्य मिळावे ही श्रींचीच इच्छा" असल्याची त्यांची खात्री होती. १९३०च्या 'दांडीमार्च'ला 'दांडीयात्रा' हे नाव गांधीजींनी दिले. "यात्रा" या शब्दातून या लढ्याचे पावित्र्य सगळ्या जगाला कळावे असा त्यांचा हेतू होता.

आध्यात्मिक क्षेत्रातील विनोबांचा अधिकार मोठा आहे असे महात्माजी नेहमी सांगत. म्हणूनच १९४०च्या सत्याग्रहात पहिले सत्याग्रही म्हणून त्यांनी विनोबाजी भावे यांचीच निवड केली. लोकांना त्यावेळी या निर्णयाचे आश्चर्य वाटले, पण तेच योग्य होते. यासंदर्भात "विनोबा जितेंद्रिय होते, गांधींना इंद्रियनिग्रह सहजसाध्य झालं नाही" हे प्रभाकर पाध्ये यांचे विधान महत्त्वाचे आहे.

१९४०च्या सत्याग्रहावर जयप्रकाशजींचा विश्वास नव्हता. भूमिगत चळवळ करावी असे ते म्हणत होते. १९४८ला समाजवादी मंडळी काँग्रेसमधून बाहेर पडली. त्यावेळी मात्र गांधीजींचा साधनसुचितेचा विचारच जयप्रकाशजींनीही मांडला. "५३ साली 'समाज बदलायचा असेल तर माणूस बदलला पाहिजे. त्यासाठी महात्माजींचा हृदयपरिवर्तनाचाच मार्ग योग्य आहे' असे जयप्रकाशजी म्हणाले होते." असे प्रा. प्रधान म्हणतात. आणि आणीबाणीतसुद्धा गांधीजींचाच विचार त्यांनी पुढे चालविला असेही ते म्हणतात. यासर्वांमुळेच "गांधीजींच्या निधनानंतर जयप्रकाशजी गांधीवादी झाले" असे प्रा. प्रधानांनी म्हटलेले आहे. शेवटी "बदललेल्या परिस्थितीत गांधीजींचे विचार आणि कार्यपद्धती यांच्या आधारे भारतात सामाजिक न्याय आणि समता यांचेसाठी संघर्ष करणे म्हणजे गांधीजींचा वारसा चालविणे असे मी मानतो," असे प्रा. प्रधानांनी विधान केलेले आहे. यात गांधीविचाराच्या आधारेच २१व्या शतकात काम करावे लागणार आहे याची स्पष्ट

अनुक्रमणिका

कबूलीच त्यांनी दिलेली आहे. म्हणजे गडकरी गांधीविचार गोठलेला आहे असे म्हणतात तर प्रा. प्रधान गांधीविचारच आपला आधार आहे असे मानतात. दोन विचारवंतानी या संदर्भात दोन स्वतंत्र विचार मांडलेले आहेत असे हे चित्र आहे.

ज्याप्रमाणे नेहरू-गांधीमध्ये वैचारिक भिन्नता होती त्याचप्रमाणे गांधी-पटेल यांच्यातही ती होती. सरदार पूर्ण वास्तववादी होते. काश्मीरप्रश्नी प्रसंगी सैन्य पाठविण्यात ते कचरले नाहीत. अहिंसेचा विचार कोणत्या मर्यादेपर्यंत करावा याचा त्यांचा म्हणून एक वेगळा विचार होता. या वैचारिक भिन्नतेमुळेच प्रा. नरहर कुरूंदकर यांनी "म. गांधी अगांधीवादी लोकांचे पुढारी होते" असे म्हटले आहे. २७ डिसेंबर ९७ रोजी महाराष्ट्र फाऊंडेशनच्या पुरस्काराचेवेळी कोल्हापुरात सुप्रसिद्ध कवी विंदा करंदीकर म्हणाले, "देशाचे विभाजन किंवा काँग्रेसची परवड म्हणजे गांधीवादाचा पराभव नव्हे. ... जोपर्यंत समाजातील सुशिक्षित वर्ग मूल्यहीनता, वशिलेबाजी याचाच आदर्श सामान्य जनतेपुढे ठेवीत आहे तोपर्यंत माझा गांधीवादही इतिहासजमा होणार नाही." गांधींच्या विचारांसंबंधी स्वातंत्र्योत्तर काळात महाराष्ट्रातील विद्वानांमध्ये काय मतप्रवाह आहेत याची थोडी कल्पना या थोडक्या विवेचनावरून येऊ शकेल.

पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाच्या इतिहासात खाडाखोड आहे. तिकडे एकाने एक मत (Theory) मांडावे व ते दुसऱ्याने खोडून स्वतःचे नवे मत मांडावे असे चित्र दिसते. निरीश्वरवाद, अज्ञेयवाद, इंपीरिकल थिअरी, अस्तित्ववाद, कांट हेगेल यांचा "ट्रान्सेडेटॅलीझम" लॉक, रीड, इमरसन यांच्या भिन्न मतप्रणाली असा भाग आपल्याला तिथे दिसतो. भारतात मात्र एकच एक विचार तत्त्वज्ञानात दिसतो. वेद, उपनिषदे, गीता यातील मूळ विचारच श्रीमंत शंकराचार्य, महावीर, बुद्ध, ज्ञानेश्वर, कबीर, नरसिंह मेहता, विवेकानंद, तुकाराम आणि बाबू अरविंद घोष सांगतात. तोच विचार लो. टिळक गीता रहस्यात सांगतात, तेच डॉ. राधाकृष्णन म्हणतात आणि नेमका हाच विचार म. गांधीजीही सांगतात. यात मतभेद, मूलभूत भेद, खाडाखोड कुठेही नाही. हजारो वर्षांची ही एकसंधी जिवंत परंपरा इथे दिसते. म्हणूनच गांधी विचार हा मुळात या भरतवर्षाच्या उन्नत परंपरेतीलच विचार आहे. तो नवा नाही पाश्चात्त्य विचारात माणसातील चैतन्याचा, आत्म्याचा माणसातील "माणूसपणा"चा, माणसाच्या ठिकाणी असणाऱ्या अंगभूत प्रतिष्ठेचा ऱ्हास होताना आपल्याला दिसतो. उदाहरणार्थ, गेल्या सुमारे दीड-दोनशे वर्षात माणसाच्या प्रतिष्ठेवर पाश्चिमात्यांनी तीन मोठे प्रहार केलेले आपल्याला आढळतात. पहिला तडाखा डार्विनने दिला. अडॉम-इव्ह-बायबल खोटे असून जेली फिश-माकड-माणूस अशी मानवाची उत्पत्ती त्याने मांडली. फ्राईडने "सेक्स भावनेचा प्रभाव आई-मुलगा, भाऊ-बहीण इ. सारख्या पवित्र नात्यामध्येही कसा असतो हे सांगून या उच्च नाते-संबंधातील मांगल्यावर दुसरा प्रहार केला. कार्ल मार्क्सने धर्म ही अफूची गोळी मानून मानवी संबंध फक्त आर्थिक संदर्भातच तपासणे अगत्याचे आहे असे सांगून माणसाची उरली सुरली प्रतिष्ठा नष्ट केली. याचवेळी भारतामध्ये प्रत्येक मानवाच्या ठिकाणी असणाऱ्या दैवी चैतन्याची सत्यता जगाला पटवून देऊन माणसाची प्रतिष्ठा पुन्हा वृद्धिंगत करण्याची किमया गांधीजींनी करून दाखविली आहे. हे लक्षात घेणे महत्त्वाचे आहे.

हा विचार थोडा स्पष्ट होण्यासाठी म. गांधींच्या विचारांची पंचसूत्री किंवा "पंचांग" पहाणे योग्य होईल. ते असे १) अहिंसा, २) सत्याग्रह, ३) धर्माधिष्ठित नैतिक राजकारण, ४) निर्भयता आणि ५) स्वावलंबी ग्राम यात त्यांचा हरिजनोद्धार, कामगार कल्याणाचा विचार, शैक्षणिक विचार इ. सर्व सामावलेले आहे. राजकारणाचे गुन्हेगारीकरण होत असताना त्याचे धर्माधिष्ठित नैतिक मूल्यांवर आधारित "शुद्धीकरण" करण्याचा महान प्रयोग करणारा द्रष्टा तत्त्ववेत्ता विसाव्या शतकात तरी गांधीजीशिवाय दुसरा सापडणे कठीण.

१९२४ सालचे गांधीजींचे दिल्लीतील २१ दिवसांचे उपोषण सर्वांना माहित आहे. त्यावेळी सर्वजण, त्यांचे डॉक्टर, मोठ्या चिंतेत होते. त्यांच्या डॉक्टरांनी त्यांना निर्वाणीचा इशारा दिला, "बापूजी, आता वीस दिवस होऊन गेले आहेत. तुम्ही जर उपोषण सोडले नाही तर आम्ही तुमच्या जीविताची हमी देऊ शकणार नाही. तेव्हा आपण उपोषण सोडावे अशी आम्हा सर्वांची प्रार्थना आहे." त्यावर बापूजी म्हणाले, "आणखी किती

तास उपोषण चालू ठेवल्यास मी जगेल?"

"फक्त २४ तास" डॉक्टरांनी निर्णय दिला. त्यावेळी त्यांनी गांधीजींची तब्येत काळजीपूर्वक तपासली. गांधीनी डोळे मिटून मौन धारण केले. शांत बसले. २४ तास झाल्यावर त्यांनी डोळे उघडले आणि म्हणाले, "डॉक्टसाो, आता माझी तब्येत तपासा." डॉक्टरांनी त्यांची तब्येत तपासली आणि निर्णय दिला, "बापूजी, चमत्कार आहे. तुमची प्रकृती पूर्वीपेक्षा सुधारलेली आहे." बापूजींच्या प्रार्थनेचे हे सामर्थ्य होते. या देशात लोकशाही टिकली याचे कारण म. गांधींनी असंख्य कर्तृत्ववान नेत्यांच्या पुण्याईचा हिमालय या देशात उभा केला हे होय. मानवाच्या आत्म्याचे नैतिक सामर्थ्य जगाला दाखवून देणारा आधुनिक राजकारणातील सिद्ध पुरुष म्हणून गांधीजींना आज जग ओळखते.

आज अशा नेत्यांची पुण्याई संपत आलेली आहे. २१व्या शतकाचे हेच महत्त्वाचे आणि खरे आव्हान आहे. आणि हे आव्हान पेलण्यासाठी पुन्हा या देशात नैतिक आणि शुद्ध चारित्र्यवान राजकारणी नेते निर्माण होण्याची खरी गरज आहे, आणि त्यासाठी पुन्हा गांधी-विचारच आपल्याला उपयोगी पडणार आहे.

२१व्या शतकात "सोय", "सवड" आणि "स्वार्थ" या तत्त्वावरच लोकव्यवहार होणार असेल, तिथे नैतिक, मूल्याधिष्ठित वैचारिक वर्तनाला काही महत्त्वच उरणार नसेल, तर तेच एक मोठे आव्हान आपल्यापुढे असणार आहे. आजची आपली स्थिती हेच आव्हान अधिक तीव्र शक्तीशाली बनेल अशीच आहे. या आव्हानाचा सामना करण्यासाठी गांधीविचारच उपयोगी पडणार आहे. मतां-साठी कशाचाही विधिनिषेध न मानणारी "लोकशाही" हेच २१व्या शतकाचे खरे आव्हान आहे. त्यातच राज-कारणाचे गुन्हेगारीकरण समाविष्ट आहे. याला वेळीच पायबंद घालावयाचा असेल तर मूल्याधिष्ठित, आत्मशुद्धी-वर निष्ठा असणारे धर्माधिष्ठित (समाजाचे धारण करणारा; तो धर्म या अर्थाने) राजकारण हा गांधीजींचा विचारच महत्त्वाचा ठरतो.

२१व्या शतकात देश समृद्धीसाठी ज्या योजना येतील त्यांना सामाजिक समतेचा भरभक्कम आशय प्राप्त व्हायला हवा, आणि इथेही गांधी विचारच महत्त्वाचा आहे. कारण त्यांचे मत धनिकांनी सामाजिक संपत्तीचे केवळ विश्वस्त म्हणून वर्तन करणे आवश्यक आहे. म्हणूनच याही संदर्भात अर्थतज्ज्ञांपेक्षाही गांधींचा विचार महत्त्वाचा वाटतो. यातील मर्म ओळखूनच की काय डॉ. राम मनोहर लोहिया म्हणाले होते, "समाजवादाच्या विचारावर गांधींच्या विचारांचे संस्कार करून एक नवी संस्कृती भारतात निर्माण करणे शक्य आहे."

पूर्ण आदर्श समाज व्यवस्था हे स्वप्न असते. ते प्रत्यक्षात आणण्यासाठी संघर्ष करावा लागतो. देशांतर्गत अशा संघर्षाला सत्याग्रहाशिवाय दुसरा पर्याय नाही. पंजाबी अतिरेकी, बोडो, नक्षलवादी अतिरेकी हे कोणालाही कधीच परवडणारे नाहीत. नागालँडमध्ये बंडखोर अति-रेक्यांविरुद्ध लढण्यासाठी आजपर्यन्त आपल्या लष्करी जवानांनी शस्त्रांचा आधार घेतला पण आता त्याऐवजी ते "गुड समॅरिटन" कॅपेनचा म्हणजेच गांधी विचारांचाच प्रयोग करू लागल्याचे व त्यात त्यांना यश येत असल्याचे आजचे चित्र आहे. शस्त्राशिवाय केवळ सेवाभावनेने लष्करी जवान अतिरेक्यांची कोंडी करीत असल्याचा चमत्कार नागालँडमध्ये याक्षणी साकारतो आहे हे चित्र निश्चितच दुर्लक्ष करण्यासारखे नाही. म्हणूनच २१व्या शतकातील देशांतर्गत आव्हाने पेलण्यासाठी अशी सत्याग्रह क्षमता असणारा निर्भय, जागरूक, चारित्र्य संपन्न समाज निर्माण करणे आवश्यक आहे. त्यासाठी गांधीविचारच उपयोगी पडेल. कारण आपल्याला (देशांतर्गत प्रश्नांसाठी) सदैव बंदुका घेऊनच संघर्ष करणे परवडणारे नाही, शक्यही नाही आणि योग्यही नाही. दै. लोकसत्तेच्या ३ सप्टेंबर ९५ च्या अंकात माधव गडकरी यांनी "होरा अहवालाची हरवलेली पाने" हा उद्‌बोधक आणि खळबळ-जनक लेख लिहिला आहे. प्रथमच उल्लेख केलेला त्यांचा गांधींवरील लेख आणि हा लेख यात एकावर्षाचे अंतर आहे. या ताज्या लेखात शेवटी ते म्हणतात, "सर्व लढाया समरांगणावरच लढल्या जात नाहीत. त्या रोज माणसाच्या दैनंदिन जीवनात लढल्या जातात. सुखे नाका-रण्याची शक्ती प्राप्त करून घेणे ही एक लढाईच आहे. तिची सुरुवात तुमच्या आमच्या जीवनात होऊ द्या म्हणजे हे सर्व हिटलर आपोआप निकालात निघतील." गांधीविचार यापेक्षा वेगळा नाही, "सुखे नाकारण्याची गांधीजींची








शक्ती" अमर्याद होती म्हणूनच त्यांनी अनेक मोठमोठ्या लढाया शस्त्राशिवाय जिंकल्या हा ताजा इतिहास आहे. 'एका गोठलेल्या वाटेचा १२५ वा वाढदिवस साजरा करणारे' आम्ही जर 'सुखे नाकारण्याच्या शक्तीच्या साधनेप्रत' आलो तर २१व्या शतकातील आव्हाने आम्ही निश्चित पेलू शकू. ही साधना शाळा-महाविद्यालयातील उगवती पिढीच करू शकेल, आजच्या राजकीय पक्षामध्ये ही शक्ती उरलेली नाही.

कोणती संस्कृती आपण स्वीकारणार? हा खरा २१व्या शतकातील आपल्या पुढचा प्रश्न आहे. पाश्चात्त्य भोगवादी, बाजारी संस्कृती की या भरत वर्षातील उन्नत परतत्त्वाचा स्पर्श असणारी संस्कृती? सध्या Globalization of American Culture म्हणजे सर्व जगातील संस्कृतींचे अमेरिकी संस्कृतीकरण करणेचा सपाटा चालू आहे. डॉ. रमेशबाबू या मुंबई विद्यापीठातील इतिहास विभाग प्रमुखांनी (जे अमेरिकन स्टडीजमध्ये पारंगत आहेत) याविरुद्ध लखनौच्या अमेरिकन असोशिएशनमध्ये स्पष्ट इशारा दिलेला आहे. या बाजारी भोगवादी संस्कृतीचे आक्रमण थोपवायचे असेल तर गांधीजींचा 'सुखे नाकारण्याचा', आत्मशुद्धीचा मार्गच आपल्यापुढे आहे. त्याला अन्य पर्याय आहे काय? गांधीजी म्हणतात, "मनुष्याला कर्तव्याचा मार्ग दाखविणारी आचारपद्धती म्हणजे संस्कृती." हा मार्ग २१व्या शतकाची आव्हाने पेलू शकेल.

शांतीनिकेतनमधील गांधी-गुरुदेवांच्या ऐतिहासिक भेटीत गुरुदेव टागोर बापूजींना म्हणाले, "या भल्या पहाटे गाणाऱ्या पाखरांसाठी तुमच्या तत्त्वज्ञानात काही जागा आहे काय?" त्यावर गांधीजी म्हणाले, "या पाखरांनी भल्या पहाटे गोड गाणी गावीत यासाठी ती रात्री पोटभर जेवून झोपी जायला हवीत याचीच मी सदैव चिंता करीत आहे." जरा विचार केला तर २१व्या शतकाची आव्हाने व त्यांची उत्तरे या गांधीजींच्या उत्तरात सामावलेली दिसतील..

☆☆☆

---

## लेखकांचा परिचय

❋ **श्री. बाबूराव चंदावार**
समाजसेवक आणि सामाजिक प्रश्नांचे अभ्यासक
***पत्ता :–*** सईनगर २, डी. १, फ्लॅट – १३, सिंहगडरोड, पुणे – ४११ ०३०.

❋ **प्रा. डॉ. द. ना. धनागरे**
पुणे विद्यापीठातील समाजशास्त्राचे निवृत्त प्राध्यापक, शिवाजी विद्यापीठाचे माजी कुलगुरू, समाजशास्त्रीय विषयांवर इंग्रजी व मराठीतून सातत्याने लेखन.
***पत्ता :*** बी-७, दिव्य कुंज अपार्टमेंटस्, १०७६ गोखले रोड, मॉडेल कॉलनी, पुणे ४११ ०१६.
दूरध्वनी : (०२०) २५६५४७३६.

❋ **डॉ. श्रीपाद भालचंद्र जोशी**
प्रख्यात संवाद-माध्यम तज्ज्ञ असून राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठाच्या जनसंवाद विद्या विभागचे माजी विभाग प्रमुख व गोखले संवाद व माध्यम संशोधन संस्थेचे माजी संचालक आणि संवादशास्त्र-जनसंवाद-माध्यम-पत्रकारिता या बाबतच्या अनेक ग्रंथांचे लेखकही आहेत. या ज्ञानशाखेतील अनेक अभ्यासक्रमांची त्यांनी रचना केली असून जनसंवाद विद्या अभ्यासमंडळाचे ते अध्यक्षही राहिले आहेत.
***पत्ता :–*** १०५, संकल्प सहनिवास, ४० खरे टाऊन, धर्मपेठ, नागपूर - ४४० ०१०.

❋ **प्रा. डॉ. विजय पाटील**
प्राध्यापक, राज्यशास्त्र विभाग, श्रीमती क. वा. महाविद्यालय, सांगली.
***पत्ता :*** निर्विकल्प, अकुजनगर, वृद्धाश्रमाजवळ-कुपवाडरोड, सांगली ४१६ ४१६. दूरध्वनी : ०९८९०९४९११०.

❋ **डॉ. एच. व्ही. देशपांडे**
Ph. D. साठी इंग्रजी विषयाचे मार्गदर्शक, शिवाजी विद्यापीठ गुणवंत शिक्षक पुरस्कार, IAAS (Indian Association for American Studies) चे २ वेळा कार्यकारी सदस्य.
***पत्ता :*** ८२० ई, शहापुरी ४ थी गल्ली, कोल्हापूर ४१६ ००१. दूरध्वनी : (०२३१) ६५११५५६.

अनुक्रमणिका

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# वैदिक संस्कृतीचा विकास

(तिसरी आवृत्ती, १९९६)

**प्रा. मे. पुं. रेगे यांच्या विवेचक पुरस्कारासह**

वैदिक संस्कृतीचा विकास ह्या बृहद् ग्रंथात शास्त्रीजींनी अधिकाराने आणि कौशल्याने आपल्या प्रदीर्घ सांस्कृतिक वारशाचे आत्मीयतेने पण चिकित्सकपणे परीक्षण केले आहे. त्यांच्या संस्कृत वाङ्मयाच्या व्यासंगाच्या व्याप्तीची कल्पना या ग्रंथावरून चांगली येते. वैदिक वाङ्मय, दर्शने, महाकाव्ये, शास्त्रे, पुराणे, बौद्ध व जैन साहित्य इत्यादी सर्व शाखांतील संस्कृत साहित्याचा त्यांनी आपल्या विवेचनात पुरेपूर उपयोग केला आहे. वैदिक संस्कृतीची समावेशक, उदार, विधायक बाजू त्यांनी उलगडून दाखविली आहे.

**डेमी आकाराची ३६+ ५७२ पृष्ठे** **किंमत रू. ३००/-**

**प्राज्ञपाठशाळा मंडळ**
३१५, गंगापुरी, वाई, जि. सातारा

अनुक्रमणिका






## लेखकांस आवाहन

'नवभारत' मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारता' कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत' च्या संपादकांना द्यावी.

४. 'नवभारत' मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत' मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

- संपादक मंडळ

हे मासिक घ. वा. जोशी यांनी के'सागर ग्राफिक्स ॲण्ड प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई